रविकिरण-मंडळाचें छत्तिसावें पुस्तक

# कांतणीचें घर

[ लघुनिबंधांचा प्रथम संग्रह ]



यशवन्त

[ राजकवि, बडोदे ]

# रविकिरण-मंडळाचीं पुस्तकें

१ किरण (गद्यपद्य-मण्डळ) ८४
२ काव्यविचार (काव्यविषयक निबन्ध-मण्डळ) १
३ उषा (पद्य-मण्डळ) ८१२
४ मधुमाधव (पद्य-घाटे-माधव जूलियन्) ८१२
५ शलाका (गद्यपद्य-मण्डळ) १
६ विरहतरङ्ग (पद्य-माधव जूलियन्) ८८
७ कला (खण्डकाव्य-गिरीश) ८६
८ नाट्यरूप महाराष्ट्र (ऐतिहासिक प्रवेश-विठ्ठलराव घाटे) १
९ छन्दोरचना (मराठी वृत्तशास्त्र, प्रो. मा. त्रि. पटवर्धन) २
१० प्रभा (पद्य-मण्डळ) ८८
११ सुधारक (खण्डकाव्य-माधव जूलियन) १८८
१२ आम्बराई (खण्डकाव्य-गिरीश) १
१३ यशोधन (पद्य-यशवन्त) २
१४ उमर खय्यामच्या रुबाया (पद्य-प्रो. मा. त्रि. पटवर्धन) १८८
१५ भावमन्थन (पद्य-यशवन्त) ८८
१६ काञ्चनगङ्गा (पद्य-गिरीश) १८८
१७ द्राक्षकन्या (पद्य-माधव जूलियन्) ८१२
१८ बन्दीशाळा (खण्डकाव्य-यशवन्त) १८८
१९ गज्जलाञ्जलि (पद्य-माधव जूलियन्) १
२० जयमङ्गला (खण्डकाव्य-यशवन्त) १
२१ फलभार (पद्य-गिरीश) ८१२
२२ अभागी कमल (खण्डकाव्य-गिरीश) १
२३ स्वप्नरञ्जन (पद्य-माधव जूलियन्) १८८
२४ यशोगन्ध (पद्य-यशवन्त) १
२५ काव्यकला (गद्य-शङ्कर केशव कानेटकर) १
२६ मराठी नाट्यछटा (गद्य-प्रो शं. के. कानेटकर) ८८
२७ तुटलेले दुवे (पद्य-माधव जूलियन्) १
२८ भाषाशुद्धि विवेक (गद्य-डॉ. मा. त्रि. पटवर्धन) १
२९ कांहीं म्हातारे (गद्य-विठ्ठलराव घाटे) १८८
३० श्री-मनोरमा (पद्य-श्रीधर-मनोरमा रानडे) २८८
३१ नकुलालङ्कार (पद्य-माधव जूलियन्) १
३२ मधुलहरी (पद्य-माधव जूलियन्) १
३३ यशोनिधी (पद्य-राजकवि यशवन्त) १८४
३४ मानसमेघ (पद्य-गिरीश) १८८
३५ यशोगिरी (पद्य-यशवन्त) १८८

# कवि यशवन्त यांची साहित्य-सम्पदा.

## पद्य.

**मित्र-प्रेम-रहस्य**

मित्रनिधनावरील विलापिका.

कि. ४ आणे

**तुटलेला तारा**

लो. टिळक यांच्या निधनावरील शोकगीत.

कि. २ आणे

**यशवन्ती**

प्राथमिक स्फुट कवितासंग्रह.

कि. १० आणे

**यशोधन**

'इंदुकला' आणि इतर उत्कृष्ट कवितांचा घवघवीत संग्रह.

[ चौथी आवृत्ति ]

कि. २ रु.

**भावमन्थन**

एक सुनीतमाला आणि निवडक भावगीतें.

कि. ८ आणे

**बन्दीशाळा**

बाळगुन्हेगारांच्या करुण स्थितीवरील खंडकाव्य.

[ दुसरी आवृत्ति ]

कि. १॥ रु.

**जयमंगला**

विविध भावगीतात्मक हृदयंगम प्रेम-कथा.

कि. १ रु.

**यशोगन्ध**

यशोधनासारखाच सरस व भावमधुर कवितासंग्रह. कि. १ रु.

**यशोनिधि**

यशोधन व यशोगंध यांचें तुल्यगुणी भावण्ड - कवितासंग्रह.

कि. १। रु.

**यशोगिरी**

धन-गंध-निधीचें विकासशील व अनुभव-समृद्ध स्वरूप दाखविणारा नवीन कवितासंग्रह. कि. १॥ रु.

**काव्यकिरीट**

बडोदा-नरेश श्रीमंत प्रतापसिंह महाराज गायकवाड, यांचे राज्यारोहणविषयक, राजनीतिगर्भ, खण्डकाव्य.

कि. १॥ रु.

## गद्य.

**प्रापंचिक पत्रें**

संसाराच्या वास्तवतेचें जिव्हाळ्यानें व काव्यात्मतेनें केलेलें रम्योत्कट चित्रण. कि. ३ रु.

**घायाळ**

हृदयस्पर्शी कादंबरी ( अनुवादित. ) कि. २ रु.

**कांतणीचें घर**

लघुनिबंध-संग्रह. कि. २ रु.

# कवि यशवंत यांचें बालवाङ्मय.



**मोतीबाग—**

बाळगाण्यांचा एकमेव वैभवशाली संग्रह. चित्रकार दलाल यांच्या कुंचलीनें पान-न्-पान मोहरलेलें आहे.

किंमत १० आणे.

**दरोडेखोर? छे, देवदूत! आणि शहाणी श्यामला—**

शिक्षण-शास्त्रज्ञांनीं प्रशंसिलेल्या दोन गोष्टी. मुखपृष्ठः-चित्रकार दलाल यांचें.

किंमत ६ आणे.

**भगवी गीता आणि चंदूचा गनिमी कावा—**

वरील प्रमाणेंच बालकांचें मनोरंजन करणाऱ्या दोन उद्बोधक गोष्टी.

किंमत ५ आणे.

आगामी

**आभाळांतील सिनेमा—**

मोतीबागेच्या तोलामोलाचा बाळगाण्यांचा संग्रह.



# दालनें

# सप्रेम–समर्पण

प्रिय सुहृद्

शङ्करराव कानेटकर

[कवि गिरीश]

आणि

गजाननराव माडखोलकर

यांस—



मकरसंक्रान्त

१८६६

# नांव ? कांतणीचं घर : १

दोन दिवस स्वाती इतक्या चिकार कोसळल्या कीं कांहीं बोलायची सोय नाहीं !—

पण, ही झाली बोलायची भाषा. खरं म्हणजे बाहेर पडायची सोय नव्हती. बोलायची सोय नसायला कुणी तोंड का धरलं होतं? उलट, कोसळणाऱ्या स्वातीनींच बोलायला एक विषय दिला; वार्ताहरांनाही विषय दिला. ज्ञानप्रकाशामध्यें कोल्हापुरचं बातमीपत्र आलं होतं कीं, वरुणतीर्थ वेशीला पाणीच पाणी झालं, ह्या स्वातीमुळं.

मी समाधानाचा सुस्कारा टाकला. वरुणतीर्थ वेशीला माझं घर नव्हतं, म्हणून नव्हे !

वाचतां वाचतां मनांत येऊन गेलं कीं, बरं झालं, साहित्यांत वरुणतीर्थ ही एक पदवी नसून, ती मला, ह्या स्वाती कोसळण्यापूर्वींच, करवीरमठाधिपतींनीं देऊन टाकलेली नाहीं! पदव्या देणाराच्या ध्यानींमनीं नसलेल्या आणि घेणाराचा संबंध नसलेल्या, हास्यास्पद वा टीकास्पद घटना पुढं केव्हां तरी घडतात आणि मग, कांहीं लोकांच्या हातांत त्या पदव्यांचीं कशीं सहज कोलीतं होतात! अन्वयार्थाबाबत त्यांचं चातुर्यच तसं असतं,-वडाची साल पिंपळाला लावण्यागत !

इतक्यांत, आमचा शिदू पाटील आला. तो म्हणूं लागला, "राव, लइ नामी झालं. पडत्याल स्वाती तर पिकत्याल मोती"

ज्ञा. प्र. मध्यें मी लगेच 'आठवड्याचा नाणेबाजार' धुंडाळूं लागलों. दोस्तांचीं प्यादीं युरोपांत तसूभर मागेंपुढें सरकतात न सरकतात तोंच मुंबईला सोन्या-चांदीच्या भावांत लगेच चढउतार होतो. हे बाजारभाव म्हणजे युद्धाचं थर्मामिटरच जणुं! युद्ध आणि बाजारभाव यांचा संबंध ( काव्यतीर्थ पदवीच्या उमेदवाराला शोभणाऱ्या दृष्टांतांत सांगायचा म्हणजे ) चन्द्र-सिंधु न्यायाप्रमाणें आहे. कौरव-पांडवांची अघाडीवरील धुमश्चक्री आंधळ्या धृतराष्ट्राला संजय प्रासाद-बसल्या सांगत होता. त्याला दिव्यदृष्टीचा लाभ झाला होता म्हणे. मला वाटतं, 'दिव्यदृष्टी' हे एकादं दैनिक असावं;

आणि त्यांतल्या तेजीमंदीच्या आधारानं त्या चाणाक्षानं कुरुक्षेत्र रंगविलं असावं त्या अंधापुढं !

पण तूर्तास माझी मात्र निराशा झाली. शिदूच्या ठोकताळ्याचा पडताळा तेजी-मंदींत आढळतो कां म्हणून पाहायला लागलों; पण त्यांत मोत्यांचा भाव अभावानेंच आढळला.

शिदूची बोळवण केली न केली तोंच, एक सर संपावी न् दुसरी यावी त्याप्रमाणें, आण्णासाहेब आले. पुण्याच्या त्या स्वातीच्या सरींनीं त्यांची फार दैना केली. ती चिरकाल आठवणींत राहील अशी त्यानीं अनुभवली असल्यामुळें, ते सांगत असतांना मीही आत्मौपम्यानें हळहळलों.

'अहो, कोण म्हणेल ह्या स्वाती म्हणून ? श्रावण-झड नुसती ! '

'एकाद्या सराईत टीकाकाराप्रमाणें 'स्वाती' नांवाची 'माती' करून टाकलीत कीं अगदीं ! ' मी म्हणालों.

'अहो, मी कोण करणार ? स्वतःच गुण उधळून जो तो काय तें करीत असतो ' आण्णासाहेब.

'पण त्या चिखल-मातींत तुम्ही रुतून बसला नाहींत हें त्यांतल्या त्यांत ठीक झालं ' मी.

'अहो, बरं कसलं ! पायीं चाललों होतों, तों थबथबून जड झालेली एक वहाण तुटली; टांगा केला, तों चार रुपयांना चाट बसली. आणि इतकं करूनही चिंब भिजून निघालों तो निघालोंच. कथा ऐकायला जावं नि हरिदासानं वेदांत-वाचस्पतीप्रमाणें माया-ब्रह्मवादाची नुसती झोड उठवून देऊन श्रोत्यांना गुदमरून टाकावं. तशी माझी अवस्था झाली. '

मी फिरून सुस्कारा टाकला.

'कां हो, सुस्कारा सोडलात ? त्यांत सांपडून आपण झपाटलों गेलों नाहीं, म्हणूनच ना ? '

'तें तर खरंच. पण दुसराही एक अर्थ आहे. स्वातीनें मोती पिकतात, हा झाला कविसंकेत. पण, आज एक टीकाकार मात्र पिकलेला पाहातों आहे. त्याची ही झोड ध्वन्यर्थानं आपल्यावरच नाहीं ना, अशी सहज शंका चमकून गेली. 'पण निभावलों' हाही अर्थ आहे ह्या सुस्काऱ्याचा. '

' ती नका शंका आणूं. तुम्ही वेदांतफंदी असता तर मी फिरकलोच नसतो तुमच्या घराकडे. '

आम्ही फिरायला बाहेर पडलों.

सूर्य नुकताच मावळतीच्या डोंगराआड गेला होता. आभाळांत न कोसळणारे मेघ अस्ताव्यस्त पसरले होते. कुरणांत चरणाऱ्या खिल्लारा-प्रमाणें किंवा चौपाटीवर जमलेल्या मुंबईकरांप्रमाणें. कुणी तुंदिल तनु तर कुणी कृशांगी; कुणी रंगेल तर कुणी साधे.

आभाळाचा रंगमहाल इतक्या अपूर्व लखलखाटानें शोभत होता कीं अग्रगण्य सम्राटानेंही आपला मुकुट खालीं उतरून ठेवावा, आणि चित्रकारांच्या सभेंतील मूर्धाभिषिक्तानं आपल्या कुंचल्या समुद्रांत किंवा जंगलांत निदान चुलींत फेकून द्याव्यात.

आणि ती रंगत अशी विलक्षण—

रंग नभाचे कसे तरी। कसे तरी ही मजा खरी ॥

किती तरी, कसे तरी, कुठें तरी ! विखुर मेघांच्या आकारांत शिस्त नाहीं; तशीच त्यावर क्षणोक्षणीं नाचणाऱ्या रंगछटांतही कांहीं शिस्त नाहीं. साराच थिल्लरपणा, साराच आडदांडपणा, साराच बेछूटपणा, साराच स्वच्छंदीपणा. अफाट क्रीडांगणावर श्रीमंतीच्या तोऱ्यानं आणि रसिकतेच्या अभिनिवेशानं मिरवणाऱ्या उत्फुल्ल विदुषीचा वृंदच जणुं.

सूर्य डोंगराआड गेलेला; तरीही पण त्याची गती सहज कळत होती. पुढं पडणाऱ्या त्याच्या पावला-पावलागणिक सगळ्या आकाशभर मागं चमत्कार उमटत होते. उलट, आकाशांतील एकसारख्या बदलत्या रंगविलासानें त्या अस्तंगत दिवाकराच्या गतीची कल्पना येत होती. युद्धाच्या मागेंपुढें पडणाऱ्या पावलानं क्षणोक्षणीं बदलणाऱ्या नाणेबाजारा, तुझी तोळामासा तब्वेत म्हणजे सट्टेबाजांची आणि दलालांची मतलबी हिकमत ! पण ह्या शारदीय आभाळांत ती कावेबाजी नाहीं, ती दलाली नाहीं, तो घबराट नाहीं. एकजात औदार्य आणि भव्यता.

ह्याचं नांव सायंकाळ.

## कांतणीचें घर

खांडेकरांच्या एका लघुनिबंधसंग्रहाचं नांव आहे सायंकाळ !

आभाळांतला आतांच्या सारखा रमणीय काव्यविलास पाहूनच त्यांनीं आपल्या लघुनिबंधसंग्रहाला ' सायंकाळ ' नांव दिलं असलं पाहिजे.

तत्वज्ञानाचा प्रखर भास्कर साक्षात् समोर नाहीं, पण त्याच्या सरत्या किरणशलाकांनीं उसळलेली तेजाळ रंगत आहे. मुग्धेचें अल्लडपण आहे, प्रौढेचें गांभिर्य आहे आणि सर्वांच्या पायाखालीं जीवनाच्या क्रीडांगणाची भव्यता आहे. शिस्त नाहीं, तंत्र नाहीं; तरी पण कांहीं तरी नियमनाचा सूक्ष्म धागा आंतून जात आहे— दिसत नाहीं पण जाणवत आहे. गतिमानताही आहे. स्वातीचे मेघ आहेत, पण ते कोसळण्याची भीति नाहीं; त्याचबरोबर त्या अस्तंगत तत्ववेत्त्याच्या शिकवणुकींतली तेजाळ रंगत खुलवून दाखवतां येण्याची पात्रता असलेलें ललित व्यक्तिमत्व आहे त्यांच्या ठिकाणीं.

ह्याचं नांव लघुनिबंध आणि असल्या लघुनिबंध–संग्रहाचं नांव सायंकाळ !

पाहिला पाहिजे वाचून ! म्हणजे कळेल कीं इतका भावार्थ ध्यानीं घेऊनच त्यांनीं नांव ठेवलंय काय; आणि आपलं हें लक्षण लागू पडतंय का !

त्या दृष्टीनं माझा हा लघुनिबंधसंग्रह–

पण लक्षणांचा नि नांवांचा मेळ बसेलच, असं नाहीं. हें लिखाण लघुनिबंध ह्या नांवाला तरी पात्र होईल कीं नाहीं, कोणी सांगावं ! मी द्यावी ती संज्ञा आणि सांगावीं तीं लक्षणं, असल्या सर्वाधिकारत्वाची मोरपिसें माझ्या मस्तकीं अजून कोणी खोवलीं नाहींत. चलनी नाण्याइतकंही मोल कुणी प्रकाशक ह्याला देईलसें वाटत नाहीं. ह्या खर्डेघाशीला ' कागदी होड्या'ही कोणी मानणार नाहीं. पिकलीं पानें, छे; त्यांच्या मानानें ह्यांच्यांत पुष्कळ कच्चेपणा. गुजगोष्टी – त्यांची तर गोष्टच बोलायला नको. आपल्या आंवाक्याबाहेरच्या त्या गोष्टी ! ह्या कोणाच्याही पासंगाला माझं हें लिखाण उतरत नाहीं, असें वाङ्मय–समीक्षकांनीं उद्यां ठरवलं तर मी ह्याला लघुनिबंध म्हणून काय उपयोग ?

मागं एकदां असा प्रकार झाला होता, म्हणून म्हणतों. १९३३

सालची गोष्ट. 'सकाळ'–कारांनीं कांहीं तरी आम्हाला देत चला कीं अशी मागणी केली होती. तसं कांहीं तरी लिहून झाल्यावर मी त्यांना दिलं. मथळा 'प्रवासांतली सोबत.' त्यांनीं छापतांना बाजूला चौकटींत म्हटलं 'एक भावकथा.' मी मनाशीं म्हणालों 'आपल्याला भावकथा लिहायला येतात बरं का!'

नंतर कांहीं दिवसांनीं एक त्यासंबंधांत पत्र आलं– "आपली 'प्रवासांतली सोबत' ही भावकथा वाचली. आमच्या अभ्यासमंडळांत त्यावर चर्चाही झाली. ह्या वाङमय-प्रकाराला काय संज्ञा द्यायची ह्यासंबंधीं आमच्यांत मतभेद झाले. तरी आपण ही 'भावकथा' कां म्हणता ह्याबद्दल स्पष्टीकरण केलेंत तर तें आम्हां विद्यार्थ्यांना मार्गदर्शक होईल."

आली पंचाईत! काय उत्तर द्यायचं? ही संज्ञाच जर माझी नव्हती तर तिचं समर्थन मी काय करणार नि लक्षण काय सांगणार? उलट, सकाळकारांनीं दिलेल्या संज्ञेचं गुप्तपणें भूषण मिरवीत होतों तेंच ह्या अभ्यासकांनी हिरावून न्यायचा डाव टाकला! शेवटीं नाइलाजानें खरा प्रकार सांगून, लिहावं लागलं कीं, मी कांहीं तंत्रविशारद नाहीं; तुमच्या सारखाच एक विद्यार्थी आहे. तुम्ही अभ्यासक एकमतानें ठरवाल ती संज्ञाच मला अधिक ग्राह्य वाटेल.

माझी 'प्रापंचिक पत्रें' प्रकाशित झालीं. त्यावर एका समीक्षकानें अभिप्राय देतांना म्हटलें कीं, पत्रापेक्षां लघुनिबंधाचीच ढब आणि साधनसामुग्री आहे ह्यांत. त्याच्या प्रामाणिकपणाबद्दल आणि स्नेहभावाबद्दल मला मुळींच शंका नाहीं. म्हणून मी हा लघुनिबंध-संग्रह पुढें करतोय. तरीपण भीतीच वाटती आहे कोण काय म्हणेल याची!

'भगवी गीता' एका मित्राला वाचून दाखवीत होतो. तीमधील संवाद ऐकून तो म्हणाला 'यशवंतराव, नाटक लिहा आतां!' त्याचं तें प्रोत्साहन, माझ्या कुवतीबद्दल त्याची उच्च अपेक्षा! हें लिखाण प्रकाशित होतांच तो आपल्या त्या सूचनेची फिरून आग्रहानं आठवण करून देईल.

आवका म्हणतील, यशवंतराव, लघुनिबंधलेखक आहेत पुष्कळ. पण वाण आहे कवितांची. नव्या नव्या सुंदर कविता ऐकवा तुम्ही आम्हाला.

पण पुष्कळ हितैषींचं आतां स्फुटकवितांवरही समाधान नाहीं. ते अपेक्षा करतात महाकाव्याची. 'भारतीय स्वातंत्र्याच्या संग्रामावर धगधगीत महाकाव्य लिहिलं पाहिजे तुम्ही,' असं कोणी सुचवितात. तर कोणी इतिहासप्रेमी 'मराठ्यांचं महाभारत' तुमच्या लेखणींतून अवतरलं पाहिजे, असा हक्काचा दावा मांडतात.

किती गाढ ममत्व आहे ह्या चहात्यांच्या मनांत माझ्याविषयीं. चहात्यांनो, मी तुमचा ऋणी आहे; आणि तितकाच गुन्हेगारही आहे पण! तुम्ही अपेक्षितां काय, आणि मी पुढं करतोंय काय? तुम्ही मागतां ताज-महाल आणि मी देतोंय —

— काय म्हणूं ?

— मी देतोंय कांतणीचं घर !

— बस्स, ठरलं. माझ्या लघुनिबंधसंग्रहाचं नांव कांतणीचं घर !

नांव ? स्वाती !

म्हणींतली समजूत ? पडतील स्वाती तर पिकतील मोती !

सत्यांश – शाळू पिकनील एवढ्या मर्यादित अर्थाचा; किंवा 'ते स्वातीस्तव अब्दिशुक्तिपुटकीं मोतीं घडे नेटकें' ह्या सुभाषितापुरता.

पण परिणामीं, बाजरी, भुइमूग, भात यांची खराबी !

सारांश, भबुक नांव घेऊन लोकांची दिशाभूल करण्यापेक्षां आणि आत्मवंचना करून घेण्यापेक्षां, हें माफक नांव ठीक.

कांतणीचं घर ! अन् ताजमहाल ? पाहूं केव्हां बांधतां येईल तो ! बांधला तरी लोक नुसते पाहात बसतील त्याच्याकडे ! उतारूंच्या राहण्याची सोय नाहीं त्यांत ! तें एक स्वप्न आहे. स्वप्नही साकार व्हावं, हातांत झेलायला यावं, अशी तीव्र मनीषा मी बाळगून आहे. पण तूर्त हें कांतणीचंच घर झालंय !

दिवा मालवून आंथरुणावर पडावं. ताजमहाल कधीं हातीं येणार ह्या रुखरुखीनें बेचैन झालेल्या जीवाला, प्रापंचिक विवंचनांनीं हैराण झालेल्या जिवाला झोंप लागतां लागत नाहीं. डोळे उघडावे तों काय, सभोंवार अथांग अंधार, टीचभर खोलींत अनंताचा अंधार! पण त्या

अंधारांतही निरखून पाहिलं म्हणजे एकादें कांतणीचें घर अंधुकपणें दिसून येतें. मनाला थोडासा धीर येतो. गोष्टींत मुलांना मी रोज सांगतों—

कावळ्याचं घर होतं शेणाचं.

चिमणीचं घर होतं मेणाचं.

कुणाचं शेण आणि कुणाचं मेण ! काड्या–मोड्याचीं देखील घरं असतात कितीकांचीं ! आणि हिरेमाणकांचीं पण असतात कुणा–कुणाचीं घरं – सिंहासनं !

गोरगरिबांच्या माना मुरगळून श्रीमंतांचं दोंद वाढलेलं असतं. आणि अश्वमेध यज्ञ म्हणजे बलिष्टानें आपल्या बाहुबलानं दुर्बळ नृपाळांची वळलेली गठडी'! सम्राटाच्या सिंहासनाच्या पायांत आसमंतांतील कितीक दुबळ्या राज्यांचे मुडदे गाढलेले असतात !

पण कांतणीचं घर असतं तिच्या स्वताच्या जीवनरसाचं ! कोळ्याचंहि तसंच असतं. पण तें जाळं असतं जाळं; हिंसात्मक बुद्धीनं पसरलेलं असतं.

कांतीणही त्याच जातीची असते की !

माझ्यासारखा लेखकही असतो त्याच जातीचा. हा घ्या कबुली जबाब.

I do not earn a living. I sponge on relatives. Every body alive is sponging on somebody, and I am sponging on relatives. I am doing it because I am a better writer than anything else. Rich people sponge on poor people. I am not rich and I do not hope to be, but I am sponging on poor people. I am getting something to eat and a place to sleep, but I am not piling up a fortune. If a man expects to write he must be will-

ing to do a little sponging. Think of any one you like, any one at all, and if you think carefully you will see that he is sponging on somebody. Mine is the most innocent form of the vice.

(William Saroyan).*

कांतीणही माझीच री ओढील. " जीवो जीवस्य जीवनम्! चाललंच आहे! पण माझं घर बघा किती स्वच्छ आहे, कसं पांढरं शुभ्र आहे! निरामय आहे! आणि अगदीं स्वताच्या जीवनरसाचं! अंधारांत धीर देणारं— अफाट सागरांतील बेटाप्रमाणं.

इतकंच काय, पण वेळप्रसंगीं जखमेवर मलमपट्टीसारखं उपयोगी पडणारं आहे हें—

कांतणीचं घर!"

* स्थूल अनुवाद—

"चरितार्थाचं साधन? आप्तस्वकीय, भाऊबंद. प्रत्येकजण कुणाच्या तरी जिवावर जगत असतो. स्वकीयाचं जीवन हेंच माझं चरितार्थाचं साधन. मी तशी गुजराण चालवितों ह्याचं कारण, इतर व्यवसायापेक्षां लेखनकामाठी बरी करतां येते मला. धनिक गरीबांच्या जीवावर गबर होत असतात. मी धनिक नाहीं, मला गबर व्हायची इच्छा नाहीं, पण दीनांच्यावर माझी मदार. मिळतं कांहींतरी निर्वाहापुरतं; कलंडायपुरती कुठंतरी जागाहि मिळते. पण जवळ कांहीं माया म्हणाल तर मी मुळींच कांहीं बाळगून नाहीं. ज्याला लेखक व्हायचं असेल त्यानं दुसऱ्याच्या जीवनावर इतपत जगायाला तयार असलं पाहिजे. कुणाचंही उदाहरण घ्या, अगदीं वाटेल त्याचं; आणि नीट लक्षपूर्वक न्याहाळून पाहा. तुम्हाला आढळून येईल कीं तो कुणाचं तरी शोषण करीत आहे. त्या दुर्गुणाचा अतीशय निरुपद्रवी प्रकार आहे माझा."

## प्राजक्ताखालीं— : २

माझ्या दारांतील प्राजक्ताचें झाड अगदीं फुलून गेलें होतें. उन्हाळ्यामुळें अंगाची इतकी तल्खली होत होती कीं, सुप्रभातीं देखील गुलाबी झोंप घेण्याचें भाग्य दुर्मीळ झालें होतें. आळोखेपिळोखे देत आंथरुणांतून उठून आळसावलेल्या स्थितीत उभें राहावें तों दारांतील फुललेल्या पारिजातकाचें दर्शन सहज घडे. एक भाग्य नाहीं, पण त्याबदली दुसरें भाग्य. नक्षत्रांनीं नखशिखान्त नटलेलें आभाळ आतां अगदीं ओकेंबोकें पाहून, सगळ्या नक्षत्रांनीं प्राजक्ताचा आश्रय केला असावा असें कोणीही – अकविदेखील – म्हणेल. पण मला वाटतें सगळ्या आळीतील लोकांच्या गुलाबी साखरझोपेचा अपहार करून त्या नाजुक फुलांनीं आपल्या पोवळी देठांची आरास थाटली असावी. एवढ्या कडक उन्हाळ्यांतही नाजुक फुलांची ही लयलूट ! माणसांचीं अंगें धर्मबिंदूंनीं थबथबावीत आणि वृक्षलतांचीं फळाफुलांनीं बहरून जावींत, काय हा उन्हाळ्याचा प्रभाव अन् सृष्टीचा पक्षपात देखील ! पण पक्षपात तरी कसें म्हणावें ! म्लान झालेल्या सखिमुखावरील धर्मबिन्दूंची शोभा फुलांनीं गजबजून गेलेल्या पारिजातकाच्या झुबकेदार फान्दीप्रमाणेंच नसते का ! अन् ह्या शोभेचा उपभोग श्रीमंताइतक्याच अभिमानानें निर्धनांनीं देखील घ्यावा. धर्मबिंदूच्या मौक्तिकमालांसाठीं तरी गरीबांना धनवन्ताकडे पाहायला नको.

इतक्यांत अंगणांतील फाटकाचें दार वाजलें. पाहतों तों शेजारच्या ठकूताई डोकीवरच्या लाल पदराची कानपट्टी सावरीत सावरीत अंगणांत घुसल्या. फाटकच वाजल्यामुळें त्यांनीं जरा इकडेतिकडें पाहिलें. पण कोणी दिसून न आल्यामुळें त्यांचें मन शान्त झालें. बाकी, त्यांची येण्याजाण्याची ढब आणि मुखावरचा भाव असा कीं जणुं कांहीं ही घर–धनीणच वावरत आहे, असें मजसारख्या तिऱ्हाइताला वाटावें. अगदीं निमूटपणें ताम्हणभर फुलें घेऊन जायची त्यांची वहिवाट असे. मला नवल वाटतें, आपल्या गोठ्यांतील गायीचें शेणसुद्धां कुणाला न्यायला सापडूं नये किंवा द्यायला लागूं नये म्हणून चटपट उठून त्याची वासलात ( म्हणजे शेणी ) लावणाऱ्या ठकूताई दुसऱ्याच्या

दारांतील फुलें मात्र निःसंकोचपणें घेऊन जात. व्यावहारिक तत्त्वज्ञानच आहे हें मुळीं! व्यावहारिक ज्ञान आणि पुस्तकी ज्ञान ह्यांत तफावत आहे असें म्हणतात तें सुद्धां ह्याच दृष्टीनें! पहाटे उठण्यापासून फायदे ह्या विषयावर शाळेंत आम्हाला निबन्ध लिहायला सांगितला होता. पण त्या फायद्यांत व्यवहार–चतुर पन्तोजींच्या देखील लक्षांत ठकूताईचा हा परिपाठ आला नसावा. दुसऱ्याच्या दारांतील फुलें लुबाडून आपल्या देवांची पूजा थाटण्यांत कांहीं गैर आचरण आपल्या हातून घडत असेल असें त्यांना वाटेनासें सुद्धां झालें आहे. अन् वाटायचें काय? 'इतक्या फुलांची काय भाजी करायचीय घरमालकाला? बरं, आम्ही तरी काय मेलीं देवासाठींच नेतों ना चार फुलें' अशी त्यांनीं आपल्या आंतल्या कप्प्यांतील मनाची कधींच समजूत घालून टाकली आहे. देव तर काय बिचारा, 'भक्तां आकळिला'! भक्तानें कशीही पूजा बांधली तरी तोंड उघडून उलटून 'ब्र' काढण्याची त्याची छाती नाहीं! पूजा हें भक्तीचें प्रतीक म्हणून मिरवायला येते ना? चित्रगुप्ताच्या कीर्द–खतावणी जोपर्यंत इहलोकींच्या कोर्टकचेऱ्यांत पुराव्यासाठीं देव धाडूं शकत नाहीं तोपर्यंत लुबाडून आणलेल्या साहित्यावर भक्तीचें प्रदर्शन व व्रतवैकल्यांची सांगता करून 'पुण्य जोडलें' असें म्हणायला आणि म्हणवून घ्यायला काय हरकत?

ठकूताईनीं शिगोशिग ताम्हण भरून कष्टाने पाय काढता घेतला. 'चार फुलें' म्हणजे भरगच्च ताम्हण असें त्यांच्या तोंडच्या हिशेबीं कोष्टक असावें. इतक्यांत येऊन घरमालकांनी विचारायला हवें होतें, 'ह्यांची भाजी करायची कीं काय तें माझें मी पाहून घेईन; पण तुमच्या परसांतली तर ही भाजी नाहीं ना?' मला तर ह्याच्याहीपेक्षां अव्वल दर्जाचा वेदान्त त्यांना ऐकवावा असें वाटतें. 'ठकूताई, इथून तिथून देव एकच. मग मालकांच्या देवांची पूजा तुमच्याही देवाला पावेलच. मग कशाला ही रामप्रहरांत उचलेगिरी!' पण ह्या विचाराची अम्मलबजावणी करायच्या आंतच ठकूताई वाटेला लागल्या. त्या बाहेर पडायला आणि दुसऱ्या एक त्यांच्या वेशाच्या व विचाराच्या चिंगूताई तिथें थडकायला एकच गांठ पडली. त्यांनीं आपली पातेली पुढें करून चार फुलें ठकूताईनाच मागितलीं. ह्या वेळीं 'भाजी' दृष्टान्त ठकूताईंना आठवला नाही. 'आहेत कीं, रग्गड

आहेत अजून तिथं ' असें म्हणत त्यांनीं आपलें नाम्हण पदराखालीं लपवून पाय काढता घेतला. आपलें कांहीं वेचत नसलें म्हणजे खुशाल बोट दाखवून द्यायला काय हरकत !

चिगूताईनीं ठकूताईंचाच कित्ता गिरविला आपल्या पातेलींत.

आणखी चार दोन मुलें गोळा झालीं. फुलें गोळा करण्यांत त्यांच्यांत चढोओढच लागलेली होती जणुं. एकाच फुलावर एकदम दोघांची दृष्टी जावी आणि हात पडावेत असें वरचेवर होई. होता होता, हमरीतुमरीवरून हातघाईवर प्रकरण आलें. उचल्यांनीं मालकी हक्काचेंच अवसान आणलें. जागतिक राजकारणाचें तितकेसें ज्ञान नसलेल्या मजसारख्याला मधुन मधुन असा प्रश्न पडे कीं, अबिसीनियावर इटलीनें चढाई केली म्हणून ब्रिटननें कां डरकाळ्या फोडाव्या ? पण प्राजक्ताच्या तळाशीं जमलेल्या बाळगोपाळांच्या झोंबाझोंबीनें मला उलगडा झाला. इथें मालक जाग्यावर नव्हता म्हणून सगळ्या आळीकरांनीं लुटीसाठीं कंबरा बांधल्या होत्या. तिथें मालक कमकुवत होता तें पाहून एका आळीकरानें चढाई केली. लगेच दुसऱ्या आळीकरानें मालकाचा कैवार घेतला. कमजोराचा कैवार उगीच का कोणाला सुचेल ! ' जे का रंजले गांजले, त्यांसि म्हणे जो आपुले, तोचि साधु ओळखावा— ' ही झाली कीर्तन—भजनांतील भाषा. तीच भाषा राजकारणांत वापरून साधुत्वाचा भाव दाखवितां येईलही; तरी पण समजणारे समजतात कीं तो नुसता आव आणला आहे. राजकारणांत ' आपुलकीची भाषा ' ही मायेची रड नसून स्वार्थाच्या ज्वाळेनें आलेला कढ असतो.

' देव तेथेंची जाणावा ! ' पृथ्वीपति काय किंवा त्याचे प्रतिनिधी काय, विष्णूचेच अवतार !

बाळगोपाळांतील ती दंगल ऐकून घरांतून कोणसें ओरडलें ' कोण आहे रे ! '

क्षणार्धांत ती बालचमू आपआपल्या शिबीराकडे, मिळाली तेवढी लूट घेऊन, धूम ठोकती झाली.

फुलांच्या पखरणीनें मोहरलेंलें तें अंगण आतां अगदीं साफसूफ झालें होतें. पण फिरून वरतून टपटप फुलें एकसारखी गळतच होतीं. झाडाचे

दुसरें स्वरूप अजूनही ओंसरलें नव्हतें. ‘ देतां किती घेशिल दो करांनीं ’ असें जणुं कांहीं तें प्रत्येकाला म्हणत होतें. आकाशांतून निखळणारीं नक्षत्रें अंतराळांतच जळून नामशेष होतात; आणि जमिनीपर्यन्त तीं पोहोंचलींच तर त्यांच्या शिळा होतात. पण पुष्पसंपाताचें तसें नाहीं. फुलांची पखरण म्हणजे कविप्रतिभेमधून प्रगट होणारें कल्पनेचें कारंजें. जाईल तिथें जन्मदात्याच्या वैभवाची दवंडी अभिमानानें पिटायची हा तर स्वभावधर्मच; पण पडल्या स्थानालाही भूषवायचें, हें विशेष. माणसें खालीं फुलें गोळा करीत आहेत ह्या गोष्टीचें कौतुक वाटून झाडानें त्या माणसांच्या माथां देखील पुष्पवृष्टीच आरंभिली. रसिकांच्या भेटींत प्रतिभा प्रज्वलित होते ती अशी. मला हेवा वाटूं लागला त्या पारिजातकाचा. चुकून माकून सुचलेल्या एकाद्या कल्पनेची आम्हांला कोण जपणूक करावी लागते. दुसऱ्यानें ती उचलली कीं ‘ चोर–चोर ’ म्हणून त्याच्या पाठीस लागायचें. म्हणजे, चोरीची आम्हांस तशी चीड असते असें नाहीं. तर, श्रेयाचा वाटा दुसऱ्याला जातो, आपल्या पदरांत पडत नाहीं ही भीति! ह्या पारिजातकाला ह्या मनोवृत्तीचा स्पर्श तरी असेल का? कल्पना–वैभव असावें तर असें उदण्ड! कोणी कितीही उपसा केला तरी समुद्राला दळिद्र येईल का?

पुन्हा जमिनीवर पूर्वीइतका फुलांचा खच झाला. मालकाला उमगणारसुद्धां नाहीं कीं आळीकरांनीं फुलें लुटलीं – लुबाडलीं म्हणून. आळीकरांच्या उचलेगिरीवर फुलांचें पांघरूण घालण्याचा तो पारिजातकाचा उदारपणा पाहून मी स्तिमित झालों.

---

भावभक्तिला हवी कशाला उसनी आरास?
उसन्या आराशीनें व्हा का धनी हमालीस?

## निर्धनांच्या वाटेंत— : ३

निर्धनांच्या वाटेंत श्रीमंतांनीं कितीतरी अडचणी उत्पन्न केल्या आहेत. आणि आश्चर्य असें कीं, श्रीमंतांना त्याची सहसा कल्पना येत नाहीं. श्रीमंती यायला कष्ट पडलेले असतात आणि कष्टाचें फळ भोगायला कुणाची व कां म्हणून हरकत असावी ? चटदिशीं, ह्या विचारसरणींतली चूक उमगून येत नाहीं आणि चूक शोधण्याची श्रीमंतांना गरज तरी काय ?

परवां आम्ही तिघे साताऱ्याहून पुण्यास यायला निघालों. प्रवासांतले हाल ह्या दिवसांत तरी कुणाला सांगायला पाहिजेत, असें नाहीं. लढाई-च्या नगाऱ्यापुढें सामान्य रयतेच्या टिमकीचा काय पाड ? आगगाड्यांची वाहतूक प्राधान्यानें लढाईच्या कामीं होऊं लागल्यानें आणि पेट्रोलचा लोंढा आधीं युद्धसंबंधीं वाहनांच्या घशांत गडप होऊं लागल्यानें, उरल्यासुरल्या मोजक्या वाहनांवर गरजू जनतेला आपली धावाधाव करण्याशिवाय गत्यंतर उरलें नाहीं आणि खेंचाखेंच व कुचंबणा भोगण्याशिवाय पळवाट राहिली नाहीं. असल्या हालअपेष्टांची ओळख नसलेल्यांना प्रवास म्हणजे प्राणसंकट वाटूं लागलें तर नवल काय ? ते भोग टाळण्यासाठीं – जरा ऐसपैसपणानें प्रवास करायला मिळावा म्हणून, दोन जागांचा जादा आकार भरून, साताऱ्याहून निघणाऱ्या मोटर बसमध्यें आम्ही एक स्वतंत्र कंपार्टमेंटच आमच्याकरितां मिळविलें.

वाटेनें ठायीं ठायीं पादचारी वाटसरू हात उभारून सलामी देत होते— आपली सोय लावण्यासाठीं मोटरवाल्याला खुणवीत होते. पण आज त्यांच्या-कडे ढुंकूनही पाहण्याची मोटरवाल्याला गरज नव्हती. येणाऱ्या मोटार-गाडींत जागा मिळेल ह्या आशेनें ठिकठिकाणच्या स्टँडवर उतारू ताटकळत बसलेले होते. ‘ जागा नाहीं ! जागा नाहीं ! ’ हें एकच उत्तर सकाळ-पासून ऐकून ऐकून, वाढत्या निराशेनें त्यांचे चेहरे अधिकाधिक केविलवाणे होत होते. ते पाहून माझ्या मनांत अनेक तर्क येऊं लागले. कुणास ठाऊक, ह्यांपैकीं ही म्हातारी आपल्या लेकाच्या लग्नाचा मुहूर्त साधून, सुनमुख बघायला उतावळी झाली असेल. कुणाची कोर्टांत तारीख असेल – वेळेवर

हजर न होतां आल्यामुळें बिचाऱ्याच्या गैरहजेरींत त्याच्या विरुद्ध दाव्याचा एकतर्फी निकालही व्हायचा! तसेंच, ह्यांपैकीं कोणी एकादा आपल्या आसन्नमरण आप्ताची अखेरची भेट घेण्यासाठीं अधीर झाला असेल – आणि भेट घडते कीं नाहीं ह्या विवंचनेनें मनांत व्याकूळ होऊन गेला असेल!

ह्या कल्पना मनांत येतांच, माझें मन अस्वस्थ झालें, ऐसपैस जागेंतही मला कोंडल्यासारखें वाटूं लागलें! खिशांत सात रुपये जादा होते म्हणूनच नाहीं कां ह्या दोन जादा सीट्स मी अडवून ठेवल्या? किंचित श्रीमंत झालो म्हणून काय झालें? दोन उतारूंची गैरसोय करण्याचा मला काय अधिकार? मला दाटीवाटीनें बसण्याची संवय नाहीं, हा कांहीं ह्या गरजू उतारूंचा गुन्हा नव्हे? मी ह्या दोन जादा सीट्स आडवल्या नसत्या तर ह्या साऱ्याच उतारूंची सोय होणार होती अशांतला भाग नाहीं. साताऱ्याहून मोटार सुटतांना, आणखी दोन तिथलेच प्रवासी ह्या सीट्सवर बसले असते; आणि आधल्यामधल्या ह्या उतारूंची अशीच कुचंबणा झाली असती. पण, ह्या नाहीं त्या, कोणातरी दोघां उतारूंचा मी आज घात केलाच कीं नाहीं? आज नकळत मी त्यांचा वैरीच झालों की!

धनवंत आपल्या पैशाच्या जोरावर निर्धनांची अशी गैरसोय किती प्रकारांनीं करीत असतील कोण जाणे! 'पैशाचा जोर' म्हणजे लांच देणें, असाच अर्थ घ्यायला नको.

माझी एक मैत्रीण– सुदेष्णा तिचें नांव– बी. ए. झाली. वडिलांच्या विराट वैभवांत वाढलेली मुलगी. सुशील व अभ्यासू. अर्थात्, तिच्या यशाचें अभिनंदन करायला म्हणून मी गेलों. तेव्हां कळलें कीं तिनें एका विद्यालयांत शिक्षकिणीची नोकरी पत्करली. 'हाडांचीं काडं करून संपादलेली विद्या अशी राबविण्यांत चूक काय?' तिच्या ह्या निरलस सेवातत्परतेमुळें तिच्या आई–बापांना फारच कौतुक वाटून, तें कसें नि किती बोलून दाखवावें, असें होऊन गेलें! पण मला मात्र विलक्षण चीड आली. ही तिची सेवातत्परता कीं द्रव्यलोभ? तिच्यासारखीनें विद्या अशी रात्रवणें हा स्वार्थाचाच प्रकार नव्हे काय? नोकरीसाठीं अनेक उंबरठे झिजवून वाटाण्याच्या अक्षतांशिवाय ज्यांच्या पदरीं कांहीं पडत नाहीं असें कितीक अर्जदार

दाखवूं ? आणि त्या वाटाण्याच्या अक्षता—तें अपेश अपात्रतेमुळें नव्हे, तर केवळ त्यांच्याबद्दल शब्द टाकायला त्यांना धनंतर आईबाप नसतात म्हणून ! पगाराचे पैसे परस्पर पातळांच्या दुकानांत दरमहाच्या दरमहा उधळूं शकणारी ती सुदेष्णा, तिला आपला गुन्हां केव्हां कळून येणार ? तिचे आईबाप धनाढ्य आहेत, म्हणूनच तिला चटकन नोकरी मिळूं शकली ना ? जिच्या लायकीला धनाढ्य आईबापांच्या शब्दांचें पासंग लागलेलें नसेल अशा सुदेष्णेच्याच गरीब वर्ग-भगिनीच्या दैवाचा तराजू कुठें तरी लांब परगांवी झुकला असेल तर त्याबद्दल जबाबदार कोण ? कौतुकाच्या आणि अभिनंद-नाच्या वर्षावांत न्हाऊन निघणाऱ्या सुदेष्णेला आपल्या ह्या गुन्ह्याची जाणीव होईल कां ?

सातारा तें पुणें मोटार-सीट साडेतीन रुपये. दोघां उतारूंच्या खिशांतील सात रुपयांवर माझ्या एकट्याच्या खिशांतील सात रुपयांच्या श्रीमंतीनें मात केली ! बी. ए. ची किंमत द. म. रु. पंचेचाळीस! पण गरीब भगिनीच्या डिग्रीला ही किंमत यायला वणवण करावी लागली आणि गैर-सोयीचें परगांव पतकरावें लागलें ! कारण, सुदेष्णेच्या डिग्रीला वडिलांच्या संपदेची सांथ ! धर्मार्थ रुग्णालयांत कधीं डोकावून पाहिलें आहेत ह्या दृष्टीनें ? तेथील सुखसोयी प्रथम लाभत असतील तर त्या धनिकांना ! गरीब रुग्णाईत मात्र सांदी-कोपऱ्यांत उपेक्षिले जातात !

विद्येला, गुणाला, श्रमाला येणारें रास्त मोल देखील गरीबांच्या पदरांत पडायला अशा रीतीनें अडचणी येतात आणि अवास्तव आडवळणें घ्यावीं लागतात. आणि त्याला श्रीमंतीच अप्रत्यक्षपणें जबाबदार आहे. श्रीमंतीनेंच निर्धनांना जिणें पुष्कळसें असह्य केलें आहे. मनुष्यच मनुष्याचा वैरी जाहे !

---

खिसे जयांचे उघडे त्यांना कुठेंहि जाणें भाग.

इटालियन म्हण–

धनवंतांच्या पापासाठीं देहदंड गरिबांना.

## धूळ आणि फुलें : ४

**सकाळच्या** सहलीला बाहेर पडलों होतों. संसारसखी सहलींतही सोबतीला होती. वसन्तऋतू असूनही आकाशांत आज अचानकपणें अभ्रें जमलेलीं दिसलीं. संसाराप्रमाणें निसर्ग देखील अकल्पित अभ्रांपासून सुटलेला नाही. स्वाभाविकच, सकाळीं वाटायला हवा तो उत्साह मन्दावला होता. पहिल्याच वळणावरच्या इराणी हॉटेलमध्यें 'चल चल रे नव जवान' ह्या पदाचे पारायण चाललें होतें. नगरपालिकेचे पाण्याचे नळ आणि हॉटेलांतील ग्रामोफोन भल्या पहाटेपासूनच सुरू होतात. चहाबरोबर जीवित–सन्देशाचे घुटके पाजणें हें इराण्याचें उद्दिष्ट नसूनही, माझ्या सारख्या मंदपाद वाटसरूला तो गीतचरण गतिदायक होई. अभ्रांत अड–खळणाऱ्या सूर्याकडे नजर जातांच, माझ्याही मनाच्या गाभाऱ्यांत 'चल चल रे नव जवान' ह्या पालुपदाचा प्रतिध्वनी उमटला,

फिरायला बाहेर पडणाराला वाटेची विचारपूस करायची नसते. बरीच वाट चालून गेल्यावर, ती म्हणाली "आज कोणच्या वाटेनं जायचं? अन् जायच्याच वाटेनं परतायला नको, अशी वाट काढायची अं"

उद्दिष्ट ठरलेलें असलें तरी निरनिराळ्या मार्गाचा हव्यास मनुष्याला असतो. साध्यासुध्या दिनचर्येंत देखील मनुष्याला ही निराळेपणाची भूक असते. किंबहुना, किरकोळ गोष्टींतील ह्या निराळेपणामुळेंच अगदीं मिळमिळीत जीवितही रुचकर होतें, रमणीय होतें. आज अम्बारींतून नगर-प्रदक्षिणा करायची तर उद्यां पुष्पकविमानांतून अन्तराळ धुण्डायचें, अशांसारखी वैभवशाली विविधता सामान्य जनांच्या संसारांत कुठून असणार ? दोन पैशाची भाजी, एवढीच त्याची मर्यादा असते ती मर्यादा न ओलांडता, काय मजा मारतां येईल तेवढी मारायची ! आज आंबटचुका तर उद्यां पोकळा किंवा चाकवत; भाजीच्या ऐवजी वाटल्यास भरीत किंवा कोशिंबीर, ह्यांच्या पलीकडे त्यांचे फेरफार किंवा चोचले काय ताण्डवनृत्य घालणार? आज खाचखळग्यांतून तर उद्यां फोफाटयांतून, एवढ्यांतूनच आवडनिवड – चाळवाचाळव करायची असते त्यांना !

दिवस वाढूं लागतो तशी वाटेवरची वाहतूक वाढत असते. पण स्वताच्या सुखदुःखांत गढून गेलेला मनुष्य वर्दळींतही एकान्तवास अनुभवीत असतो. 'कोणच्या रस्त्यानं जायचं' हें सोबतिणीनें विचारलें, तेव्हां कुठें मला अंगावरून येणारा-जाणारांची गर्दी वाटूं लागली आणि त्यांच्या कटाक्षांचा सासुरवास वाटूं लागला. म्हणून आम्ही रहदारीचा रस्ता सोडून एक फूट-वाट धरली. खाणींतील दगडांची वाहतूक करणाऱ्या वडारांच्या खटाऱ्यांचा तो रस्ता. पावला-पावलागणिक धूळीचे फवारे उसळूं लागले. तिनें नाक मुरडलें. त्या मुरड-लिपींत 'कुठली वाट काढली ही' हें वाक्य जुळलें होतें. मला राहवलें नाहीं—

'लोक काय कमी धुळफेंक करतात आपणावर ?' पायानें अधिक आवेशानें धूळ उडवीत मी बोलूं लागलों. 'आपल्या घरापुढल्या विठ्ठल-मन्दिरांत अखण्ड नामसप्ताह चाललेला असतो कधीमधीं. पाहिला असशील कीं तूं. तम्बोरी खालीं म्हणून ठेवायची नसते त्या उत्सवांत. आळीपाळीनें ती गळयांत अडकवून छेडीत राहावयाचें व्रत घेतलेलें असतें त्या भाविकांनीं. अगदीं तशीच अखण्ड धूळफेक चालूं ठेवायचें व्रत पत्करणारी कांहीं सज्जन-मण्डळी समाजांत असतात. वर्षानुवर्ष धूळीच्या बुचकुल्या फेकींत राहणें हेंच त्यांचें काम. वैकुंठपेठेचे ते भाविक व्यापारी विठ्ठलमन्दिरांत जमतात आणि समाजशासनासाठीं सिद्ध झालेल्या ह्या मतलबी साधूंना मुद्रामंदिरांचा आसरा घ्यावा लागतो. विठ्ठलमन्दिरांत बुक्का-गुलाल; इकडे ही साळसूद धुळफेक ! आपण नखशिखान्त लडबडलों आहोंत त्या धुळींत ! अगदीं वर्षानुवर्ष ! अगदीं अकारण आणि अन्याय्य ! मग ह्या पायांखालच्या घडी-भराच्या धुळीचें काय विशेष !'

'पण मी म्हणतें, एवढं का आकाण्डताण्डव करतात हे' ?

'हें काय विचारणं ? समाजशुद्धि करायची आहे ना त्यांना ?'

'मग खरे गुन्हेगार कसे दिसत नाहींत त्यांना ?'

'न्यायदेवता आंधळी असते आणि हे निवाडा करायला आसन ठोकणारे स्वयंमन्य पंच भ्याड असतात ! गणितांत नाहीं का 'अ-ब-क'चे धिडवडे काढीत ? ते अ-ब-क काय कधीं कुणाला जाब विचारणार आहेत!

कोणीकडून सिद्धांत स्थापायचा एवढेंच जाणतात हे गणिती! पण त्या 'अ-ब-क'च्या ऐवजीं सहावा जॉर्ज, प्रिन्सेस एलिझाबेथ, अशांना लावूं देत पाहूं बिगारीला,—केवळ उदाहरणादाखल तरी? तत्क्षणीं तो छापखानेवाला आणि तो सिद्धान्ती खडी फोडायला रवाना झाले नाहींत तर कशाला?'

'म्हणजे, कुणाच्या आध्या-मध्यांत नाहींत अशांचे हे काळ म्हणायचे! खऱ्या बदमाषांचीं नांवं-'

'वा:! म्हणजे त्यांना मुळींच शुद्ध नसते असं समजतेस कीं काय? छे, हो! आंधळ्या देवतेचे हे पुजारी आंधळेही नसतात आणि बेसावधही नसतात. खऱ्या पण बलवान बदमाषांचीं नांवं घेतलीं तर आपलीं खाण्डोळीं होतील, धनवान बदमाषांचीं नांवं घेतलीं तर आपली उपासमार होईल आणि सत्ताधारीं बदमाषांचीं नांवं घेतलीं तर आपला कोंडमारा-अंधार कोठडीइतका कोंडमारा-होईल ह्याची पूर्ण शुद्ध असते मतलब्यांना! जो अपकार करूं शकत नाहीं किंवा अपकार करायला प्रवृत्त होण्याइतक्या खालच्या पायरीवर उतरणार नाहीं, त्याच्याच आयुष्याचा हे पंचनामा करणार.'

'फुलांवर डल्ला मारायचाय वाटतं?'

आम्ही धुळींतून धुळफेकीवर बोलत बोलत येऊन, आतां एका मोठ्या फुलबागेच्या बांधाकडेनं जाऊं लागलों आहों ह्याची शुद्ध मात्र माळणींच्या ह्या खणखणींत सवालानें आली. धरलेली वाट बागेकडे जाणार आहे हें ठाऊक नसतांना, धूळ खात खात आलों आणि वरती चोरीच्या आरोपांत सांपडलों! माळणींना उत्तर देण्यापेक्षां मी हिलाच म्हणालों 'हें घे धुळवडीचं हातोहात प्रत्यंतर!'

माझ्या उद्‌गारांचा संदर्भ अर्थातच माळणींना काय माहीत? पण त्यांतला कडवटपणा,— कंगालांच्या तो पुष्कळच परिपाठांतला असतो. काबाडकष्टांनीं ज्यांना भाकरी मिळवायची असते त्यांना ती दररोज कडवटपणाशीं तोण्डी लावूनच खावी लागते. गुलाबाच्या बागेची पैरवी करून करून फुलांचा दरवळणारा सुगन्ध त्या हुंगतातच. [ निसर्गाच्या त्या अनुग्रहाला अवरोध करण्याला बागवान असमर्थ आहे म्हणून! ] पण त्या

सुगंधाचं कौतुक वाटण्यापेक्षां गुलाबाच्या कांट्यांनीं काढलेल्या ओरखड्यांच्या निशाण्याच त्यांना अंगभर जाणवत होत्या. ह्या फिरस्त्यांना ओरखडा काढून, आपण नाहक आगळीक केली ह्या जाणीवेनें त्या लगेच ओशाळगत झाल्याशा दिसल्या; नव्हे, त्यांना आमच्याविषयीं किंचित आपुलकी वाटूं लागली. कारण, लागलीच त्यानीं हिला आळवायला सुरवात केली—

' नाहीं हो बया. उगीच म्हणाल्यें ! घ्या कीं फुलं. तुमास्नी काय कमी गेलंया ! मस्त फुलं असतील तुमच्या बंगल्यांत. '

लगेच मी म्हणालों, ' एक तर बरोबर देखील आणलं आहे मी ! '

' तुमच्यासारखीं माणसं कशाला येत्याल इवतं लांब फुलांसाठीं ? पण घ्या, घ्या; आमचीबि फुलं घ्या कीं ! भरल्या बागेंत काय वाण पडायचीय ? ' माळणी आर्जवानें म्हणाल्या.

आम्ही ' नको–नको ' म्हणत असतांनाही त्या दोघीचौघींनीं भराभर खुडलेल्या गेंदेबाज फुलांनीं हिची ओटीच भरली. उपकाराचें हें ओझें असह्य होऊन, हिनें चार आणे ' मुलांना खाऊ ' म्हणून एकीच्या ओच्यांत टाकले. पण स्वागताला सवद्याचें स्वरूप यावें हें कंगाल कष्टाळूंना देखील खपत नाहीं. पैसे परत देऊन त्यांनीं हिची पाठवणी केली.

घराच्या दारांतच आमची प्रतीक्षा करीत असलेले आमचे एक स्नेही आढळले. त्यांच्या हातांत दैनिकाचा ताजा अंक होता. त्या अंक–धरल्या हातानें आमच्या पायावरील धूळ दाखवून ते म्हणाले, ' काय हो ही धुळवड ! '

' कोणची ? ' असा खवचट प्रश्न, त्यांच्या त्या अंक – धरल्या हाताकडे पाहून एकाद्यानें विचारला असता. पण मी म्हणालों, ' चालायचंच ! धुळीकडे काय लक्ष द्यायचंय ? लक्षच द्यायचें असेल तर— '

माझें अर्धे वाक्य पुरें करण्यासाठीं तिनें गुलाबगेंदांनीं गच्च भरलेली हातरुमालाची झोळी त्यांच्यापुढें उघडी केली.

आमचे आवाज ऐकून, मुलेंही धांवतच दारांत दाखल झालीं.

' शेवटीं फुलं लागलीं ना हाताला ? झालं तर ! ' हें आमच्यापैकीं कोणी म्हणायचीच काय जरूरी होती आतां ?

---

## भाण्डणांतलें प्रेम—



इराकमध्यें नोकरीस असलेल्या एका महाराष्ट्रीयानें आपल्या बहिणीस पत्र लिहिलें होतें. तिथें तो परमुलुखांत एकटा; आणि कुटुम्बांतील सर्व मण्डळी – सहचारिणी देखील – इकडे स्वदेशीं. तेव्हां त्याच्या पत्रांत प्रेमळांच्या आठवणीनें भरून येणाऱ्या उरांतील व्याकुलता आणि व्याकुलतेंतून उद्भवणारे उसासे असणार हें उघडच होतें. फार तर ठिबकलेल्या आसवांचे शिन्तोडेही त्यांत असतील. कल्पना करतां आली म्हणून दुसऱ्याच्या खाजगी पत्रांत डोकावण्याची इच्छा नसणारा मनुष्य –

विरला जानन्ति गुणान्
विरलाः कुर्वन्ति निर्धने स्नेहम्
विरलाः परकार्यरताः
परदुःखेनापि दुःखिता विरलाः

हें सुभाषित ज्यावेळीं निर्माण झालें त्यावेळीं टपालखातें असतें तर त्या कवीनें ह्या सुभाषितांत 'दुसऱ्याच्या पत्रांत न डोकावणाऱ्या मनुष्याची' खासच गणना केली असती. त्या इराकवासी महाराष्ट्रीयाचा भाचा तें पत्र वाचीत होता. मानवी स्वभावानुसार मी त्या पत्रावरून वारंवार चलाखीनें चोर – नजर फिरवली. त्यांतील चटकन डोळ्यांत भरलें तें वाक्य असें:–

"लग्न झाल्यापासून सुलूशी कोणत्याही कारणानें
मला रागावण्याचा प्रसंगच आला नाहीं —"

अर्थात् 'आपण फार भाग्यशाली आहों,' हाच त्या वाक्याचा संदर्भावरून अर्थ होत होता.

त्याच टपालानें माझ्याही भार्येचें पत्र मला तिथें आलें होतें. तें मी वाचूं लागलों तों सगळा सूर निराळाच. त्यांत तिनें लिहिलें होतें–

'तुम्ही इथें नसल्यामुळें सणावाराला पक्वान्न करायचा आहे कुणाला हुरूप! शिवाय, तुम्ही घरीं असलात म्हणजे रोज जीं रागाचीं पक्वान्नं मिळतात तीं देखील आतांशीं दुर्मिळ झालीं आहेत.'

दोन पत्रांतल्या मजकुरांतला हा विरोध मला एकदम जाणवला. आपल्या बायकोवर रागावण्याचा कधीं प्रसंगच आला नाहीं, ह्याबद्दल धन्यता मानणारा एक पति, आणि नवऱ्याच्या रागाचा खुराक मिळत नसल्यामुळें खेद करणारी एक पत्नी ह्यांतील कुणाचा हेवा करावा ? 'पोटासाठीं इराककडे दौड मारणाऱ्या सुलूच्या सौभाग्या ! नशिबवान आहेस बाबा तूं !' असा स्वगत उद्‌गार खणखणीत सुरांत काढण्याला सुद्धां मी कमी केलें नसते, पण तितका एकान्त नव्हता मला तिथें त्यावेळीं !

आणि एकान्तांत येऊन कलंडायला सवड सांपडली तेव्हां त्या नाटकी उद्‌गाराऐवजीं, त्या परस्परविरोधी वाक्यांचाच मी विचार करूं लागलों. ही सुलू इतकी कां एकजीव झाली आहे आपल्या नवऱ्याशीं ? कां तिला स्वताचं कांहीं मतच नाही ? कां तिचा नवरा इतका प्रभावसंपन्न आहे कीं, सूर्यापुढें चंद्राला जसें निराळं अस्तित्व उरत नाहीं, त्याप्रमाणें तिलाही तें त्याच्यापुढें उरत नाहीं ? किंवा तो इतका प्रखर अरेराव असला पाहिजे कीं, तिला त्याच्यापुढं आत्मप्रकटीकरणाला धारिष्टच होत नसावं ! कोणत्याही रंगाशी समरस होणाऱ्या आणि कोणत्याही भांड्याचा आकार धारण करणाऱ्या पाण्याप्रमाणें सुलूचें व्यक्तित्व असेल तर त्या व्यक्तित्वांत 'पाणी'च नाहीं, असें कां म्हणूं नये ? पति–पत्नीच्या आवडी–निवडी आणि आचार–विचार ह्यांची ही भूमितीच्या * सिद्धान्तांत शोभणारी एकरूपता संसारास कितपत खुमारी आणील ? आणि पत्नीशीं एकदाही भांडण्याची पाळी न अनुभवलेला हा गृहस्थ परदेशीं कोणत्या गोष्टीचं चिन्तन करीत असेल ? सकृद्दर्शनीं आदर्शवत् वाटणारा त्यांच्या सांसारिक जीविताचा एकजीवपणा, मी जों जों विचार करूं लागलों तों तों, मला लोभनीय वाटेनासा झाला.

मी तर घरांतील मण्डळींवर नेहमींच रागावत असतो. भाण्डणें, रागावणें हें निष्प्रेमाचेंच लक्षण होय, असाच सर्वसामान्य समज दिसतो. म्हणजे शेजाऱ्या–पाजाऱ्यांच्या दृष्टीनें 'आमच्यांत सलोखाच नाहीं' म्हणा-

* सिद्धान्तः– जर एका त्रिकोणाच्या दोन बाजू व त्यांमधील कोन दुसऱ्या त्रिकोणाच्या दोन बाजू व त्यांमधील कोन यांशीं अनुक्रमें समान असतील, तर ते त्रिकोण एकरूप असतात.

यचा ! पण मग माझ्या रागावण्याला माझ्या पत्नीनें पक्वान्नाची कां उपमा दिली ? बाजारहाट करण्यांत फसणाऱ्या रामावर मी रागावतो तो काय केवळ माझ्या सात-आठ दिडक्यांच्या नुकसानीमुळें हळहळूनच का ? चिंतूनें परीक्षेंत नापास होऊं नये म्हणून त्याची मी जी वारंवार कानउघाडणी करतों ती त्याच्या कल्याणाची मला जर कळकळ नसती तर केली असती का ? चिमीनें कानावर केसांचे फुगे काढू नयेत, तोंडावर भरमसाट पावडर फासूं नये आणि पातळ-पोलक्यांत छाकटेपणा आणूं नये म्हणून मी जें तिला टोचून बोलतों तें काय मला सौन्दर्यदृष्टि नाहीं म्हणून, कां केवळ रागावण्याची हौस आहे म्हणून ?

कोणी म्हणतील 'घरांत तुम्हीच वडील आहांत म्हणून आपल्या रागावण्याचें समर्थन करणें तुम्हांला परवडतें ! ' असें म्हणणारांनीं माझें कचेरींतलें वागणें पाहावें. तिथें तर मी अगदीं कनिष्ठ प्रतीची कारकुनीच करीत आलों आहे ना ? म्हणून, वरिष्ठांशीं खटके उडण्याचे प्रसंग कांहीं थोडेथोडके नाहीं आले ? वरिष्ठापुढें आपलें मत मांडण्याचें ज्यांना धारिष्ट होत नाहीं ते त्यांच्या तानमानानें आपलें दिनमान सुरळीत निभावून नेऊं बघतात. 'निभाव'-धोरणाच्या चहात्यांनीं मला वेळोवेळीं धाकही घातला आहे कीं, 'कशाला तूं वरिष्ठांशीं इतकी हुज्जत घालतोस ? अशानं तुझी उचलबांगडी मात्र होईल !' त्यावर मी त्यांना म्हणे, 'तें सोडा ! एवढ्यासाठीं उचलबांगडी करायला वरिष्ठ कांहीं आत्मघातकी नाहींत. त्यांना-सुद्धां खरीखुरी विरुद्ध बाजू मांडून दाखवणारा हवाच असतो. कामाच्या निकालाला वरिष्ठच जबाबदार खरे; पण माझ्याकडे असलेल्या कामांतील त्यांचे निकाल त्यांना कमीपणा आणणारे असतील तर ते मला नाहीं खपणार ! त्यांची नाचक्की ती माझी नाचक्की ! आणि म्हणून जरूर तिथें मी बिन-दिक्कत हुज्जत घालतों, हें काय त्यांना माहीत नाहीं ? '

तीच तऱ्हा मित्राशीं वागतांना. माझा मित्र दिनू. वारंवार येतो माझ्याकडे. कांहीं नवीन चक्र डोक्यांत भ्रमूं लागलें कीं तें माझ्यापुढें उघडें केल्याशिवाय त्याला राहवत नसे. त्याच्या बहुतेक कल्पना अव्यावहारिक. अर्थात्च त्याच्याशीं वादविवाद आणि शेवटीं भांडण ठरलेलें ! न भांडतां

तो परत गेलाय असें एकदां सुद्धां घडलें नसेल. त्याची व्यवसायांत देखील वागण्याची जी पद्धत होती तिचा वेळोवेळीं कडक शद्बांत धि:कार करावा लागे मला. तसें पाहिलें तर मी त्याच्याशी भांडायला तो काय माझे चार चव्वल खातोय ? आपल्या व्यवसायांत तो जें नफानुकसान भोगील त्याचें सोयरसुतक का मला आहे ? आणि विक्षिप्त कल्पनांच्या भरीं भरून तो जें आपलें हसें करून घेईल त्यानें माझ्या अंगाला का भोकें पडणार आहेत ? मग मी त्याच्याशीं कां भांडावें ?

कां भांडावें ? त्याच्यावर माझें प्रेम आहे म्हणून, त्याची विचार–सरणी मला चुकीची वाटते म्हणून आणि चुकीचे मार्ग त्यानें टाकून द्यावेत म्हणून. आम्ही कांहीं चाळींतल्या नळावर जमणाऱ्या साळकाया–म्हाळकाया प्रमाणें भांडत नव्हतो; किंवा गल्लींत खेळणाऱ्या पोरांसोरांप्रमाणें संस्कृति–संवर्धकांना धक्के बसण्यासारखें आचकट – विचकट बोलत नव्हतो किंवा वडिलार्जित मालमत्तेची वाटणी करून घेणाऱ्या भाऊबंदांप्रमाणें एकमेकाच्या छातीवर बसून वाडवडिलांचा उद्धार करीत नव्हतो. दिनूबद्दल मला जिव्हाळा वाटला नसता तर मी कशाला त्याच्याशीं शिरा ताणताणून हुज्जत घातली असती ? ज्या दिवशीं त्याच्याबद्दल मला कांहींच वाटेनासें होईल त्या दिवसापासून, पाहाल तुम्ही, तो माझ्याकडे आला होता हें तुम्हाला कळून सुद्धां यायचें नाही ! इतकें कशाला ? माझ्याकडे आणखी जे जे सद्गृहस्थ येतात त्यांची कधीं तुम्हाला कुणकुण तरी कळली आहे का?

"पाखरा, येशिल कां परतून" ही रे. टिळकांची कविता प्रसिद्ध आहे. समज असा आहे कीं, ही कविता बालकवींना उद्देशून आहे. तसें असेल तर, टिळकांची बालकवीवर फार माया असे, असें ही कविता सांगत आहे. त्यांच्या वियोग-समयीं उचंबळून आलेल्या भावना ह्या आर्त-गीतांतून ओसंडत आहेत.

**मत्प्रेमानें दिल्या खुणांतून एक तरी वळखून**
**पाखरा, येशिल कां परतून**

असें टिळक विचारीत आहेत तें रास्तच आहे. जिवाभावांच्या सांठवणींचीं प्रतीकें म्हणजे भेटवस्तू ! त्यांपैकीं एकादी तरी आठवून – ओळखून बालकवींनीं

भेटायला यावें, असें टिळक अपेक्षितात. पण मला ह्या भावगीतांत सर्वांत हृदयस्पर्शी कल्पना वाटते ती ही–

जन्मवरी मजसवें पहा ही तव चंचूची खूण

ह्या ओळीवरून असें वाटतें कीं केव्हां तरी ह्या दोघां कवींचें चांगलेंच भांडण झालें असलें पाहिजे; त्यांतही बालकवीनीं टिळकांना वर्मी लागतील असे शद्ब उच्चारले असले पाहिजेत. " बाळा, तुझ्यावरील लोभामुळें मी तुझे वाक्प्रहार सोसले आहेत; त्यांचे हे वण ओळखून तरी परत येशील का ? " असें विचारण्यांत स्नेहलांमधील दुरुक्तीना सुद्धां आठवणींच्या भांडारांत चिरंतन अमोलिकता येते, असें सुचविलें आहे. वियोगांत नुसत्या सुखकर प्रसंगांचेंच चिंतन होत असतें, असें नव्हे; तर, एकमेकांनी एकमेकांचे साहिलेले अपकार सुद्धां चिंतनीय होतात. ज्या प्रेमलांच्या संगतींत अपकारांना वाव मिळाला नसेल त्यांच्या प्रेमाला असीमता आली असें म्हणतां यायचें नाहीं; आणि वियोगांतील चिंतनाला देखील एक प्रकारचा तुटपुंजेपणा येईल, असें म्हणायला हरकत नाहीं.

भाण्डण हें निष्प्रेमाचें लक्षण नसून प्रेमाचेंच लक्षण आहे. लवणा–वाचून स्वयंपाक आणि भांडणावांचून संसार, दोन्हीही मिळमिळीतच ! जें जसें निसर्गतः नांदत असेल तसें तें खपवून घेणें हे उदासीनतेचें लक्षण आहे. ज्याच्यावर आपली ममता आहे त्याला आपल्या मनाजोगें रंगरूप यावें म्हणूनच आपणाला त्याच्यावर रागावण्याची पाळी येते. बागेंत लावलेल्या रोपाची जोपासना करतांना आपण त्याची छाटाछाट करतो. मोगऱ्याच्या वेलाची पानें खुडून टाकतो. ती कात्री चालवणें, तें नख लावणें प्रेममूलक नव्हे कां ?

( A man cannot love the countryside without prunning and clipping, smartening and tidying, making meaningful and useful what has achieved beauty by accident, and imposing order upon the sweet disorder of nature. ...... We

cannot love a tree or even a stone, but sooner or later we must be pruning the tree or chipping a piece off the stone.

-- C. E. M. Joad. )

माझ्या बायकोला हें भांडणाचें तत्वज्ञान पुरतें माहीत आहे. म्हणूनच ती माझ्या रागाला पक्वान्नाची उपमा देते.

मिसेस गुत्तीबाई ( Mrs. Gutty ) म्हणतात कीं हें आयुष्य इतकें थिटें आहे की प्रेम करायला सुद्धां तें पुरेसें नाही; मग भांडायला कुठून वेळ आणायचा ! ह्या उद्‌गाराच्या चिटोऱ्याच्या मागेंपुढें काय संदर्भ आहे तो मला अजून गवसला नाहीं. पण त्या बाईनीं वैवाहिक जीवन ( Mrs. ह्या उपाधीवरून ) अनुभवलेलें दिसतें. तसें असेल तर त्यांनीं एकाद्या दिवशीं तरी भांडणांतल्या प्रेमाची ( अर्थात् हितबुद्धीनें उद्‌भवलेल्या भांडणांतल्या प्रेमाची ) चव चाखली असेलच.

आणि वाङ्मयांत पतिपत्नीच्या कलहाला ' प्रेम–कलह 'च म्हणतात. इतकेंच नव्हे, तर, ' राग ' ह्या शब्दाचा एक अर्थ देखील ' प्रेम ' असाच आहे. आणि तुम्हांला दुसरें एक गमक सांगतों. प्रेमजन्य राग परमावधीला गेला कीं त्याचें पर्यवसान उभयतांच्याही डोळ्यांतून आसवें वाहण्यांत होत असतें. मायेच्या माणसावर कडकडून रागावून पाहा म्हणजे माझ्या ह्या विधानाचें प्रत्यंतर येईल.

सुलूच्या सौभाग्यालंकारा ! सुलूच्या स्वत्वाला अजून जाग आली नाहीं, हाच तुझ्या त्या समाधानाच्या उद्‌गाराचा अर्थ आहे. तिला जाग आल्यावर मग मला सांग, न रागावतां किती दिवस जातात ते ! माझी खात्री आहे, मग तूंही म्हणूं लागशील कीं—

रागाविण अनुरागा काय माधुरी ?

---

## दृष्टिदोष— : ६

शंकरराव जेवायला बसले होते. उमाबाईनीं डावीउजवीकडचे पदार्थ अगदीं साक्षेपानें केले होते. पण शंकररावांच्या नाकाला पडलेल्या मुरडी कांहीं ढळत नाहींत असें पाहून, तव्यावरच्या भाकरीवर पाणी फिरवून ती उलटून टाकतांना, उमाबाई म्हणाल्या 'कधीं कांहीं केलंय अन् इकडं तें मनाला आलंय ? सदा न् कदा कपाळावर आठ्या नि नाकावर सुरकुत्या ! मनुष्यानं मेलं करायचं तरी कसं ?'

त्यांनीं हें म्हणायला आणि नानासाहेब तिथें यायला एकच गांठ पडली. त्यांच्या तोंडांत सुपारी नि हातांत कांहीं लिखाण होतें. पाटावर बसतां बसतां ते म्हणाले, 'वहिनी, तुम्ही का मनाला लावून घेतां ?

घृतें क्षीरें होती प्रमुदित मखीं निर्जर खरे
परंतु ते तापप्रद रस जयाला ज्वर भरे

नेहमींच पदार्थ बिघडलेले नसतात. खाणाराचीच प्रकृति बिघडली असली तर तुमचा सुग्रणपणा काय करणार ?'

'तें हातांत काय आहे ?' आपल्यावरचा मारा चुकविण्यासाठीं शंकररावांनीं विचारलें. 'नवीन लघुकथा आहे वाटतं ?'

'लघुकथा कां लघुनिबंध तें तुम्हीच ठरवायचं.' नानासाहेब.

'वाचा, वाचा भाउजी. त्यानं तरी जेवणाला रुची येतीय कां पाहूं ?' उमाबाईनीं प्रोत्साहन दिले.

'आज सकाळीं एक गमतीदार अनुभव आला. म्हटलं लिहून काढावा. पाहा अं कसा काय वाटतो तो.' इतकें म्हणून, नानासाहेबांनीं वाचायला सुरुवात केली. —

भल्या पहाटे आज जाग आली. पोटांत कुटु कुटु करीत होतं. 'इतक्या लवकर उठून काय करायचं ? अजून पुष्कळ अवकाश आहे दिशा फटफटीत व्हायला' अशा विचारानें मीच माझ्या मनाला थोपटायचा — दामटून निजवायचा प्रयत्न केला. पण, पोटानं कधीं कुणाला निजून दिलं आहे

निवान्त ? अर्थात्, हा परिणाम होता अपचनाचा. तेव्हां उठून, किरकोळ घरगुती औषधें घेतलीं; आणि पोट शेकावं म्हणून गरम पाण्याची पिशवीही घेतली पोटाशीं. पडल्या-पडल्या पोट शेकण्यापेक्षां, बसून पोटाशीं पिशवी घेतल्या-घेतल्या कांहीं वाचावं, म्हणून डोळ्यांवर चष्मा चढविला. पण मजकूर स्पष्ट दिसेना. अपुऱ्या झोपेमुळें नजरेंत मंदपणा आला असेल, अशा कल्पनेनें, जडभरित डोळे चांगले खसखसून चोळले अन् फिरून चष्मा चढवून वाचायला लागलों. तरीही स्पष्टपणें दिसेना.

आतां चष्मा पुसायची पाळी आली ! म्हणून मखमली चामड्यानें कांचा पुसल्या नि फिरून चष्मा चढविला. 'वा: छान दिसतंय की' असें स्वतःशीच पुटपुटत, पुढें पसरलेल्या नियतकालिकावरून नजर फिरविण्यासाठीं जरा लवलों. वाचतां वाचतां, अल्पावधींतच फिरून अधुकपणा जाणवूं लागला. पावसांतून हिंडतांना चष्म्याच्या कांचांवर ज्याप्रमाणें ओलसरपणा चढतो तसा कांहींसा प्रकार अनुभवतोयसें वाटलें, अन् आश्चर्यचकित झालों. हवेंत तर इतकें धुकें मुळीच नव्हतें कीं जें हांहां म्हणतां चष्म्याच्या कांचांना बिलगावं ! फिरून चष्मा साफ करून, समोर व आवतीभोंवतीं बघायला लागलों. सर्व कांहीं साफ ! नजरेला कसलीच अडचण किंवा आडकाठी आली नाहीं ! किंचित् देखील किल्मिष आढळलं नाहीं ! म्हणून, पुढें वांकून वर्तमानपत्र वाचूं लागलों. तोंच, पुन्हां तोच अनुभव – चमत्कार ! पुन्हां कांचांवर धुक्याचा थर चढला. आश्चर्य दुणावलं.

ह्या रामपाऱ्यात, ह्या मंगल एकान्तांत असलं भुसकट चिवडून मी काळाचा अपव्यय करूं नये, म्हणून तर मला ही दैवी सूचना होत नसेल ना ? असाही एक कल्पनातरंग मनांत चमकून गेला. पण आपल्या वाया जाणाऱ्या आयुष्याबद्दल खंत बाळगून, इषाऱ्यासाठीं जगन्नियंत्यानें पऱ्यांना धाडावें, इतके आपण त्याचे लाडके कुठले असायला, असा दुसऱ्या कल्पनातरंगानें पहिल्याला लगेच संक्षेप देऊन टाकला.

तोंच एकदम ध्यानीं आलं कीं, पोटींशी धरलेल्या गरम पाण्याच्या पिशवीचा हा प्रभाव आहे ! तिच्यामुळें तिच्या आसपासच्या हवेचें बाष्पीभवन होत असावं आणि वाचनासाठीं आपण अधोवदन होतांच त्या बाष्पार्द्र

हवेच्या सान्निध्यांत चष्म्याचीं भिंगें येतांच, ती वाफाळ हवा त्यांना तत्काळ बिलगत असावी, व दृष्टीला बरोबर दिसेनासं होत असावं ! प्रत्यंतर पाहावं म्हणून फिरून पूर्ववत् प्रयोग करून पाहिला. तंतोतंत तोच अनुभव ! केलेली अटकळ खरी ठरली ! सारांश, बिघडलेल्या कोठ्यामुळें दृष्टीला हा उपसर्ग पोहोंचला ! कोठा आणि दृष्टी यांचे इतके घनिष्ट संबंध आहेत अं ! !

आहेतच नाहीं तरी ! एक हरदासी विनोदकथा आहे. पुष्कळांच्या ऐकिवांत असेल. ह्याच भावार्थाची आहे. काय म्हणे, एक सद्गृहस्थ प्रकृतीच्या नादुरुस्तीची तक्रार घेऊन एका डॉक्टराकडे गेले. डॉक्टरानें विचारलं 'काय होतंय ?' तो म्हणाला 'पोटांत दुखतंय.' डॉक्टराला पुढं विचारणें भाग आहे. 'पोटांत दुखायला, कांही खाण्या-पिण्यांत गैरशिस्त-पणा झाला काय !'

डॉक्टराकडे जायचें म्हणजे स्पष्टपणें सांगितलें तरच नीट उपचार होणार. ते सद्गृहस्थ कबूल करते झाले, 'हो, काल करपलेली भाकर खाल्ली खरी !'

डॉक्टरांनीं उपचारार्थ औषध तयार केलं आणि त्यांना सांगितलं "हें दिवसांतून तीन – चार वेळां डोळ्यांत घालायचं" त्या व्यथिताला आचंबा वाटला. कांहीं समजूतीचा घोटाळा तर नाहीना ? म्हणून, डॉक्टरांचा उपमर्द न होईल अशा बेतशीर सुरांत त्यानं खुलासा केला, "डॉक्टर, माझे डोळे नाहीं दुखत; पोट दुखतंय !"

डॉक्टरांनीं धिमेपणानें सांगितलें, "दिलंय तेंच औषध बरोबर आहे. पोटाचा अन् दृष्टीचा फार निकटचा संबंध आहे. प्रथम दृष्टीच साफ व्हायला हवीय तुमची ! भाकरी करपट आहे असं तुम्हाला नीट दिसून आलं असतं तर तुम्ही ती कशाला खाल्ली असतीत ?"

त्या रुग्णाइतानें तें औषध डोळ्यांत घातलं कीं गटारांत फेंकून दिलं?– आमच्या त्या हरिदासानं काय सांगितलं तें मला आज आठवत नाहीं; पण त्या सद्गृहस्थाचे डोळे मात्र खास उघडले असले पाहिजेत !

आतां, माझ्या आजच्या अनुभवाच्या दृष्टीनं, ही गोष्ट जरा उलटी आहे. इथं आधीं दृष्टी बिघडल्यामुळें पोट दुखायला लागलं; तर, माझ्या

बाबतींत, पोटदुखीमुळें दृष्टीला तो 'तसा' उपसर्ग 'पोहोंचला!'

नाहीं तरी, डॉक्टर लोक तरी तेंच म्हणतात कीं!

ज्याच्या पचनक्रियेंत बिघाड झाला आहे तो साफ दृष्टीनं जगाच्या व्यवहाराकडे बघू शकत नाहीं; त्याचा एकंदर दृष्टिकोनच दूषित होतो. मानवी मनोभावनांचें योग्य आकलन व्हायला किंवा नैसर्गिक सौंदर्याचा रसिकतेनें आस्वाद घेतां यायला मनुष्याची पचनक्रिया अगदीं निर्दोष असायला हवी. निरोगी मनुष्याचा दृष्टिकोनही निर्मळ असतो.

विकृत वाङ्मयनिर्मिती करणारांचा कोठाच बिघडला असला पाहिजे. एरव्हीं, त्यांना हें जग (आहे तसं सुन्दर न दिसतां) अवास्तव ओंगळ असल्यासारखं कां दिसावं? सारस्वत म्हणजे काय? विश्वव्यापाराची लेखकाच्या मनावर जी प्रतिक्रिया होते तीतून निर्माण होणारं वाङ्मय. अर्थात्, मनच जर अप्रसन्न, व्यथित, असंतुष्ट असेल तर त्यावर घडणाऱ्या प्रतिक्रियेचा परिपाक तरी प्रसन्न आणि निरामय कुठून होणार? आणि मन अप्रसन्न, व्यथित, असंतुष्ट असण्याचं एक मुख्य कारण, त्याच्या क्षुधांचें उद्दीपन, तर्पण, विसर्जन किंवा नियमन जितक्या रीतसर (normally) व्हायला हवें तितक्या रीतसर होत नाही, हें होय. अर्थातच, कोठा बिघडतो. आणि कोठा बिघडला कीं मनःस्वास्थ्य नष्ट होतं. आणि मनाच्या दुरुस्ती-नादुरुस्तीवर दृष्टिकोन अवलंबून असणार! ज्याची प्रकृति निर्दोष त्याचा दृष्टिकोनही निर्दोष!

हा सिद्धान्त कांहीं नवीन नाहीं. आणि नवीन सिद्धांत सांगण्याइतका मी कुठें शरीरशास्त्रज्ञ व मानसशास्त्रज्ञ आहे? पण पूर्वसिद्ध सिद्धांताची मला ज्या तऱ्हेनें प्रचीति आली तींत नाविन्य आहे की नाहीं? आणि अनुभवांतलं हें नाविन्यच वाङ्मयनिर्मितीला निमित्त होत असून, प्रिय वाचक हो, तुमच्यासारख्या सहृदय सुहृदांशिवाय हें नाविन्य दुसऱ्या कुणाला सांगायला मी धांव घ्यावी?

नानासाहेबांनीं कागद गुण्डाळतांच, शंकरराव उमाबाईस म्हणाले 'तुझ्या ह्या पदार्थींत नसलेली मोहरी नि मिरपूड घालायला नानासाहेब कसे वेळेवर धावून आले!'

---

## हा गुण कीं अवगुण ? : ७

अलीकडे जनूभाऊ माझ्याकडे फारसे येत नाहींत. आणि क्वचित् आले तरी मागल्या पायानेंच; उभाउभी दोन शब्द बोलून परत जातात. त्यांच्या व्यावहारिक धोरणाबद्दल मी माझी नापसंती स्पष्ट शब्दांत एकदां सांगितली तेव्हांपासून त्यांच्यांत हा बदल झाला. निंदकांचा शेजार तुकाराम-बोवांना हवासा वाटला तरी सर्व – साधारण मनुष्य [ संतपदाचा अभिलाषी नसल्यामुळें ] नेहमीं उठतो – बसतो तो आपल्या प्रशंसकांच्या पंगतींत. कान-उघाडणी करणाराच्या वळचणीकडे तो सहसा वळणार नाहीं.

अशाच विचारानें मोठमोठ्या टीकाकारांच्या लेखणीनें कुठें तरी दडी मारलेली असावी. दुसऱ्यांच्या लिखाणांतील दोषांची हकालपट्टी करण्यासाठीं टीकेचे वळसे उपयोगी पडण्याच्या ऐवजीं त्यांच्यांतील शत्रुबुद्धीच्या उठावणी-लाच कारण होतात. निर्भीडपणा, स्पष्टवक्तेपणा ह्या गुणाच्या नाण्यानें शत्रुत्व मात्र पदरांत येतें. आणि मग प्रश्न पडतो कीं––

असल्या कांहीं गुणांना सद्‌गुण कां समजतात ? सद्‌गुण व दुर्गुण यांची गणना करतांना, छापखान्यांत कंपोज सोडवितांना टाईप जसे चुकून भल-त्याच खणांत फेकले जातात तसा, कांही तरी गाफिलपणा एकदां होऊन गेला असावा; आणि पूर्वजांनी केलें तें प्रमाण मानून चालायच्या भाबडेपणामुळें, झालेली चूक गतानुगतिकत्वामुळें तशीच आजपावेतों गिरविली जात असावी. दुरुस्तीची कुणाला बुद्धि होत नसावी !

मी एका कादंबरीवर लिहिलेलें सडेतोड परीक्षण माझ्या एका मित्राला आवडलें. पुढें लवकरच त्याचीही एक कादंबरी प्रकाशांत आली. तेव्हां, त्यानें मला तसेंच निर्भीड परीक्षण लिहून देण्याची विनंति केली. परीक्षणाच्या प्रसिद्धीची तो व्यवस्था करणार होता. जनूभाऊंची मला आठवण झाली. एकदां तोंड पोळलें तेवढें पुरें असें माझ्या चटकन ध्यानांत आलें. पण–

"कादंबरीच्या गुणावगुणांचें स्पष्ट दिग्दर्शन व्हावें अशी माझी इच्छा आहे; मला तें मार्गदर्शक होईल. गुळमुळीतपणा, भिडस्तपणा, किंवा केवळ स्तुति ह्यांनीं दिशाभूलच होण्याचा संभव फार. आणि दिशाभूल न करील

तोच मित्र." असें त्यानें आपलें मनोगतही व्यक्त केलें होतें. निर्भीड परीक्षणाची आवर्जून मागणी करणारा कादंबरीकार मनांतून प्रशंसेचीच अपेक्षा करीत असतो,— किंबहुना आपली कलानिर्मिति प्रशंसेलाच पात्र असल्याबद्दल अवास्तव आत्मविश्वास गुप्तपणें बाळगून असतो, ह्याची त्यावेळीं मला तितकीशी जाणीव नव्हती. मित्राची मागणी प्रांजळ आहे असा ग्रह करून घेऊन, मी त्याच्या कलाकृतीची यथास्थित विचक्षणा केली. चांगल्याला चांगलें म्हणण्यांत सढळपणा दाखविला नाहीं किंवा वाईटाला वाईट म्हणण्यांत अंगचोरपणा केला नाहीं; आणि तें परीक्षण त्याच्याकडे योग्य ठिकाणीं प्रकाशित करण्यास पाठविलें. आश्चर्याची गोष्ट अशी कीं, माझ्या कादंबरीकार मित्रानें तें परीक्षण प्रसिद्ध करण्याची तरतूद केली नाहीं. इतकेंच नव्हे तर, त्यानंतरच्या आपल्या कृतीवर मजकडून अभिप्राय मागविण्याचा नादही त्यानें पुढें सोडून दिला.

निर्भीडपणा, स्पष्टवक्तेपणा हा गुण मानला गेला आहे. उलट "सत्य अपकार करी बोलत्याला । परी ऐकत्याला उपकार" ह्या जर्मन सुभाषिताचा मला अनुभव आला आहे. त्या कादबरीकाराच्या पुढील कलाकृतींत सुधारणा झाली कीं काय, आणि त्या सुधारणेला माझा टीकालेख निमित्त झाला का, हा मुद्दा वादग्रस्त आहे. पण एवढें मात्र खास कीं, मी त्या गुणाची कास धरून एक मित्र गमवून बसलों आहे – कांहीं शत्रू निर्माण केले आहेत. सिंहावलोकन करतांना नेहमी प्रश्न येतो कीं, स्पष्टवक्तेपणानें मी काय साधलें ? हा सद्‌गुण समजणें चूकच नाही कां ?

'तुम्हीच सांगा राधाबाई, ठकूताईनीं हें असं बोलणं चांगलं का ?' असा जेव्हां चिंगूताई प्रश्न करतात तेव्हां राधाबाईनें काय उत्तर द्यावें ? चिंगूताई किंवा ठकूताई ह्यांपैकीं कुणातरी एकीच्या वटारलेल्या डोळ्यां-शिवाय तिच्या वाट्याला काय यायचें ? दोघींनाही न दुखावतां, शिरसलामत निसटून जाण्याइतकी राधाबाईला अक्कल नसेल तर तिच्या झिंज्या कोणी-तरी एकजण धरणारच कीं !

स्पष्टवक्तेपणा हा व्यवहारांत गुण नसून दुर्गुण आहे. व्यवहारांत ज्याला वागायचें आहे तो ह्या गुणाचा टिळा लावून कसा मिरवूं शकणार ?

स्पष्टवक्तेपणाची पताका खांद्यावर घेणारा मनुष्य व्यवहारशून्यच असला पाहिजे. निःस्पृह माणसाला सर्व जग कस्पटाप्रमाणें आहे ! बरोबरच आहे ! त्याला त्या जगाकडून कांहीं मिळणारच नाहीं. आणि ज्याच्याकडून आपल्याला काहीं मिळणारच नाहीं तें आपल्या हिशेबीं कस्पटासमानच होय ! पण तें कस्पटासमान कशानें झालें ? आपल्या गुणामुळें ! तो गुण – तो 'सद्‌गुण' स्वीकारणाऱ्याला वनवासाशिवाय थाराच उरणार नाहीं. राघोबा पेशव्याला पुतण्याच्या खुनाबद्दल देहांत शासन सांगण्याची पूर्वतयारी म्हणून रामशास्त्र्यानें मुलें-माणसें माहुलीला पाठवून न्यायाधिशाचीं वस्त्रें आधीं खालीं उतरून ठेवलीं !

व्यवहारांत वागायचें ज्यांना जमत नाहीं त्यांच्या ठिकाणींच असले गुण प्रकर्षानें आढळतात. नुकसान तर त्यामुळें ठेवलेलेंच आहे. मतलबी दुनिया त्यांचे धिंडवडे काढणारच ! त्या धिंडवड्यांनीं होणारे हाल आणि अंतरीं होणारी तगमग ह्यांची प्रखरता सौम्य भासावी व सह्य व्हावी ह्यासाठीं– मनाची समजूत घालायसाठीं – ह्या व्यावहारिक दुर्गुणांना 'सद्‌गुण' म्हणून मानायचें इतकेंच ! मूर्ख म्हणवून घ्यायला राजीखुषीनें कोण तयार होईल ? केलें तेंच योग्य केलें असें त्याचा अहंकार त्याला सांगत असतो आणि तें कसें योग्य, ह्याचें समर्थन करायला शिकवीत असतो. भरडले जातांना 'हुतात्मे' म्हणून भरडले जात आहोंत असें मानण्यांत जी स्वतांची खुशामत व आत्म-शान्ति, तीच उघड उघड वाताहत करणाऱ्या अव्यवहार्य गुणांना — दुर्गुणांना — 'सद्‌गुण' म्हणून संबोधण्यांत आहे.

व्यवहार हा आटयापाटयाचा खेळ आहे. हुलकावणी दाखवून कोंडी फोडण्याइतकी चलाखी ज्याला साधत नाहीं तो पाटीवरच्या किंवा सुरा-वरच्या प्रतिपक्षीय खेळाडूचा रपाटा खातो. व्यवहारांत, खेळाप्रमाणेंच, रपाटा खाणें हें भूषण नसून, कोंडी फोडणें हें भूषण आहे. आणि कोंडी फोडतांना छाती वर काढून निभाव लागत नाहीं; अंग चोरून घ्यायची कला व चपळाई उपयोगी येते. अंग चोरण्याची कला स्पष्टवक्तेपणाच्या गळयांत गळा घालून नांदेल कां ?

---

# संक्रान्तीचा संदेश— : ८

दौशी कुटुंबांत कुणी महिलांनीं हलवा करायला घातला होता, तर कुणी पूर्व-तयारीच्या गडबडीत होत्या. त्या गडबडीच्या दिवसांत एक विद्यार्थी मजकडे आला आणि सुन्दर सजावटीची एक गोंडस कोरी वही मजपुढें करून उभा राहिला. परिपाठानें त्या मूक अभिनयाचा अर्थ 'संदेश हवा आहे' असा मला करतां आला असता. पण त्या वहीवर लिहिलें होतें "प्रिय सौ. ताईस." मी बुचकळ्यांत पडलों. मकरसंक्रान्तीपर्यन्त भाऊबीज लांबवण्याला कांही शास्त्राधार आहे काय, म्हणून मीं त्याला प्रश्न केला.

"बहिणीला संक्रान्तीचा तिळगुळ पाठवायचा आहे. पण व्यावहारिक तिळगुळ न पाठवतां, वाङ्मयात्मक पाठवावा, अशी इच्छा आहे. आपणासारख्या मान्यवंतांकडून ह्या वहीत संदेश घेऊन, मी ही वहीच तिला नजर करणार आहे. गुरु म्हणूनच केवळ नव्हे, तर थोर साहित्यिक म्हणूनही, अग्रपूजेचा मान आपला आहे."

ही त्याची कल्पना ऐकतांच मी म्हणालों, 'घ्या लिहून—

"तिळगुळ घ्या । गोड बोला"

एवढ्यावरच माझी बोळवण करूं नये, अशा अर्थाचा फिरून अभिनय करून, आपल्या हाताच्या बोटांशीं चाळा करीत, तो मान खालीं घालून उभा राहिला.

गुळगुळीत झालेलें नाणें भिक्षेकऱ्याच्या कटोऱ्यांत टाकून त्याला वाटेला लावणाऱ्या (निर्ढावलेल्या) पेढीवाल्याप्रमाणें, आपल्या अंतःकरणाचा कंगालपणा बिनदिक्कत व्यक्त करायला, मला अजून शिकायचें होतें.

मी कांहीं प्रतिष्ठित साहित्यिक नव्हतों. पण आडचणींत सांपडलेला मनुष्य पळवाट शोधतो. नवीन संदेश उभ्याउभ्या देण्याइतका मी कल्पनाकुबेर नसल्यामुळें, सुभाषितांच्या कुणग्यावर गुजराण करण्याखेरीज मी काय करूं शकणार? त्यानें पुन्हां एकदां माझ्यावर प्रश्नार्थक नजर रोखली. मी म्हणालों, 'बरं तर; आणखी घ्या लिहून—

सत्यं ब्रूयात् प्रियं ब्रूयात् । न ब्रूयात् सत्यमप्रियम् ॥

" म्हणजे काय ? " त्यानें विचारलें.

" अर्थ अगदीं सरळ आहे. खरें बोला, आवडणारें ( म्हणजेच गोड ) बोला. आणि अप्रिय असणारें सत्य बोलूं नका. " मी.

त्याचें समाधान झालें नाहीं. त्यानें विचारलें, "पण ह्या दोन्ही सुभाषितांचा मेळ कसा घालायचा ? मला जिथं हें कोडं पडत आहे तिथं माझ्या बहिणीला तरी ह्यांतून काय बोध होणार ? "

" तिच्या नवऱ्याला ती आवडते ना ? तिच्या सासू–सासऱ्यांची तिच्या-बद्दल कुरकुर नाहीं ना ? मग खास सांगतों, तुमची बहीण अशिक्षित असली तरी तुमच्यापेक्षां जास्त समंजस असेल. तुला विद्यार्थ्याला वाटली तरी तिला ह्या दोन्ही वचनांत विसंगति वाटणार नाहीं. ह्यांतील दर्शनी विसंगतीचा व्यवहारांत कसा मेळ घालावयाचा हें तिला कळत असलेंच पाहिजे. एरव्ही, सासू, सासरा, व पति ह्यांची मर्जी ती प्रसन्न करून घेऊंच शकणार नाहीं. " एवढ्यानें त्याचें समाधान झालें नाहीं असें पाहून मी म्हणालों, " संदेश त्रोटकच पाहिजे अशी अट नाहीं ना ? ठीक आहे; ठेवून जा ही वही. "

तो आनंदानें गेला; आणि दुसऱ्या दिवशीं परत आला तेव्हां ती वही त्याच्या हातांत देऊन मी म्हणालों " बसला आहे का मेळ ? वाचा पाहूं. " मोठ्या हौसेनें तो त्या दोन्ही सुभाषितांखालील भाष्य वाचूं लागला.

" थोड्या विचाराअन्तीं लक्ष्यांत येईल कीं, ह्या सुभाषितांत विसंगत असें कांहीं सांगितलेलें नाहीं. खरें तर बोलायचें; गोड तर बोलायचें ! पण सत्य अप्रिय असेल तर बोलायचें नाहीं ! म्हणजे मूग गिळून बसायचें ? छे, छे ! सत्य आणि मधुर यांचा मिलाफ करायचा. अप्रिय वाटणारें सत्य सांगायचा प्रसंग आला तर मौन नाहीं पत्करायचें. तर, अप्रिय असणारें सत्य अशा रीतीनें सांगायचें कीं, ती रीति मधुर वाटली पाहिजे. सत्य सांगायला जाऊन अप्रियतेचे धनी व्हायचें नाहीं. उघड उघड अप्रिय वाटणारें सत्य, मर्मभेदकपणा वगळून, विषारीपणा टाळून, अगदीं हळुवारपणें – प्रसंगीं विनोदाच्या फुलेलानें माखून पुढें केलें, तर अप्रियपणा पदरांत यायचा नाहीं.

" तिळगुळ घ्या । गोड बोला " म्हणजे खुषमस्कऱ्याची भूमिका पत्करा,

असा अर्थ नव्हे. तर, संस्कृत वचनाचा वर विस्तार केल्याप्रमाणें, खरें बोला, गोड बोला, आणि खरें बोलूं गेल्यास तें रुचणार नाहीं असें जेव्हां दिसून येईल तेव्हां तें 'अप्रिय खरें' माधुर्यानें थबथबून जाईल अशा रीतीनें बोला. 'गोड' म्हणजे तेवढ्यापुरतें गोड, असा संकुचित अर्थ घेणें चूक आहे. ज्याला ह्या सुभाषितांत विसंगति वाटते त्याच्या आन्तर मनांत 'गोड' म्हणजे 'तोंड-देखलें' असें समीकरण घातलें गेलें असावें. पण जें शाश्वत परिणामीं गोड तेंच खरें गोड असतें."

विद्यार्थ्याचें हें वाचन चालूं असतां मी त्याच्या मुद्रेकडे पाहात होतों. उष:कालच्या अंधुक उजेडांतही कळ्या ज्याप्रमाणें उमलूं लागतात त्याप्रमाणें त्याच्या चर्येवर खुलावट दिसूं लागली. आभाळांतून धांवणाऱ्या मेघाची छाया जमीनीवरून सरकत चाललेली दिसावी त्याप्रमाणें त्याच्या मनावरील शंकेचें पटल दूर होत असल्याचें प्रतिबिंबच जणु कांहीं मी त्याच्या चेहऱ्यांत पाहत होतों. अधिक खुलासा करावा म्हणून मी बोलूं लागलों—

'हा विषय इतका व्यापक आहे की, त्याच्या सांगोपांग विस्ताराला तुमची वही आणि माझी लेखणी अपुरी आहे. लोकमान्यासारख्या प्रतिभावंतानें गीतारहस्याएवढें भाष्य रचावें, इतकी ह्या विषयाची व्याप्ति आहे. पण, तुम्हांला एक कथा सांगतों. कदाचित् तुम्ही ती ऐकलीहि असेल.

'एका राजाचा आवडता पंचरंगी पोपट होता. वस्तु प्रेमाची असली तरी ती कुणाच्या तरी स्वाधीन केल्यावांचून राजेलोकांचें चालत नाहीं. तो पोपट एका चाकराच्या ताब्यांत देऊन, राजानें बजावलें, 'ह्याच्या संगोपनांत मुळींच हयगय होतां कामा नये, उत्तम तऱ्हेनें ह्याची निगा ठेवून, मला रोजच्या रोज खुशालीची वर्दी द्यायची! जर कां हा पोपट मेला असं माझ्या कानीं आलं तर तुझी गर्दनच छाटली जाईल! ध्यानांत ठेव.'

मुजरा करण्यापलीकडे चाकर काय करणार? बाकी, त्यानें मुजरा केला, कां आपल्या नशिबाला हात लावला! कारण, पोपट राजाचा असला म्हणून काय झालं? अमरपट्टा तर त्यानं मिळवला नव्हता? झोपडी न् राजवाडा! – सर्वसंचारी मृत्यूला दोन्हीही समानच! एके दिवशीं पोपट, देह ठेवून, पंचतत्वांत विलीन झाला! आतां सायंकाळीं राजाकडे वर्दीला

जाण्यापूर्वी चाकरानें सारी निरवानिरवच करायला पाहिजे ! शिक्षेच्या अम्मलबजावणींत कसूर न करण्याबद्दल राजाची ख्याती होती. चाकर 'आलीया भोगासी सादर' झाला.

राजा – हं! काय म्हणतोय आमचा पंची ?

चाकर – ठीक आहे, हुजूर ! सकाळपासून डाळिबाला त्यानं चोंच लावली नाहीं.

राजा – बाकी ठीक आहे ना ?

चाकर – बाकी सारं ठीक आहे, सरकार ! पाण्यावरही पण आज त्याचं मन गेलं नाहीं !

राजा – असं ? हां, समजलों ! पण, एकंदरींत ठीक आहे ना ?

चाकर – तसं ठीकच आहे कीं त्याचं ! काय कमी आहे ? सकाळपासून नुसता उताणा पडून आहे !

एक मैत्रेय– उगाच दगदग करून घ्यायला तो काय दरिद्र्याचा पोपट आहे ? [चाकराच्या बाजूचा डोळा त्यानें हळूंच मोडला ]

राजा – बाकी कांहीं विशेष नाहीं ना ?

चाकर – तसं काय विशेष असणार, खुदावन्त ! पंख मुद्दां हालवायची त्यानं तसदी घेतली नाहीं आजच्या दिवसांत ! तंगडी वर करून जो एक–दांचा पडलाय तो आख्खा दिवस तसाच आहे !

राजा (उसळून)– म्हणजे, 'मेलाय' म्हणून कां नाहीं सांगून टाकीत एका शब्दांत ?

चाकर (हात जोडून, अजीजीनें)– तसं म्यां कसं म्हणावं चाकरानं, धनीसाब ! माझी गर्दनच उडवत्याल कीं, मा बाप !

समजला न ह्या गोष्टींतला भावार्थ ? सुभाषितांतल्या विसंगतीचा मेळ आहे ना ? सांगायचं तें खरंच सांगायचं ! खोटेपणा तर पदरांत येतां कामा नये ! पण खऱ्यांत जी नग्नता असेल ती वस्त्रावगुण्ठित केली पाहिजे, जो विखार असेल तो मारून टाकला पाहिजे '–यू क्विनाईन प्रमाणें.'

ह्या विवेचनानें खूष झालेला विद्यार्थी हनुमान–गतीनें माझ्या ओसरी-वरून अंगणांत आणि अंगणांतून रस्त्यांत उडाला.

---

# वाङ्मयोपासकांचें ध्येय— : ९

विद्यार्थ्यांच्या एका वाङ्मयमंडळाचा उद्घाटन-समारंभ माझ्या अध्यक्षतेनें साजरा व्हायचा होता.

मंगल कार्यांत पुष्कळ वेदमूर्ति जमलेले असतात; आणि कार्य यथा-सोपस्कार यथासांग पार पाडायला ते असमर्थच असतात असें नाहीं. पण 'श्रीमन् महागणाधिपतयेनमः' म्हणायचा मान असतो मुख्य उपाध्येबोवाचा. तसलाच प्रकार ह्या उद्घाटनाच्या अध्यक्षपदांत असतो.

मानाचें स्थान चालून आल्यावर तें परतवून लावणारा महापुरुष विरळा. तें स्वीकारायचं म्हणजे 'झाकली मूठ' उघडी करून दाखवायची. उघडी मूठही 'सव्वा लाखाची' आहे असं सिद्ध करतां आलं तर तेंच भूषणावह नव्हे का?

ह्या विचारानें मान पत्करल्यावर, — अर्थातच परिपूर्तीची विवंचना आली.

ज्या भूमिकेचा पेहराव पांघरून वाङ्मयाच्या क्षेत्रांत मी वावरत आलों तीमध्यें कांही अनुकरणीय गुण चालकांना आढळल्यामुळेंच त्यांनीं ह्या उपरोक्त मानाची सुपारी मला दिली असावी, हे उघड आहे. वाङ्मयाच्या अभ्यासकांपुढें, त्यांच्या संस्कारसुलभ आणि भावविवश मनांची जडणघडण योग्य तऱ्हेनें व्हावी म्हणून, आदर्श व्यक्ति उभ्या करणें हा चालकांचा हेतु असतो व तो स्तुत्यच होय. पण एका कवीला बोलावण्यांत चालकांचा हेतु—

— सर्व सदस्यांनी कवीच व्हावें असा असणें शक्य नाहीं;

— तशी सर्व सदस्यांची आकांक्षाही नसेल, आणि—

— आज कवींची एवढ्या उदंड प्रमाणांत राष्ट्राला गरज आहे अशांतलाही भाग नाहीं. राष्ट्राच्या गळ्याभोंवतीं आवळले गेलेले पार-तंत्र्याचे पाश अधिकाधिक घट्ट केले जात असतांना, गाण्यासाटीं गळा खुला करणाऱ्या व्यक्तीपेक्षां, त्या गळ्याभोंवतीच्या चिवट तांती तोडायला सज्ज होणारांची आज आवश्यकता आहे. सगळ्याच मानव्याचा स्वाहाकार करणाऱ्या बकासुरांनीं वसुंधरेवर थैमान माण्डलें असतांना, गुलगुल गोष्टी

आणि प्रणयालाप गाणाऱ्यांपेक्षां त्या बकासुरांना कुंबलणारे, त्यांच्या दंष्ट्रा फासटणारे भीम आज हवे आहेत. वाचीवीरांपेक्षां कृतिवीरांची आज पैदास व्हायला हवी. कल्पनेच्या विमानांतून विहार करणाऱ्या वाक्पटुपेक्षां प्रत्यक्ष विमानविद्या शिकून तरबेज झालेले व होणारे वैमानिक आज उपयुक्त ठरतील आणि शब्दांच्या सरबत्तीनें प्रतिपक्षाला घायाळ करूं पाहणाऱ्या मुजोरांपेक्षां तोफांनीं आग वर्षविणारे — तोफाची आग झेलीत व गिळीत पुढें जाणारे धाडसी गोलंदाज आज हवे आहेत.

पण वाङ्मयमण्डळाच्या उद्‌घाटनासाठीं बोलवून आणलेल्या मान्य-वरानें असें बोलून कसें चालेल ? ह्यांत औचित्याची केव्हढी हानी आहे ! सुरुवातीलाच विसर्जनाचे मंत्र म्हणणें म्हणजे 'मूले कुठारः' च होय. बारशाच्या सोहळ्यासाठीं निमंत्रिलेल्या लेकुरवाळीनें एकादा 'पाळणा' गोड गळ्यानें गावून दाखवावा अशीच अपेक्षा असते. 'गोविंद घ्या कुणि गोपाळ घ्या' ह्या कौतुकपूर्ण पालुपदाऐवजीं 'भरला पुर मायेचा लोंढा वाहुनिया जाशी' अशी तिनें विरक्तीची विलापिका गायची नसते किंवा संततिनियमनाचा प्रचार करावयाचा नसतो. एव्हढेंही व्यवहारज्ञान ह्या महात्म्याला नाहीं कीं काय, असेंच श्रोते कुजबुजू लागतील. 'खराच कवि रे कवि' असेंही शेलापागोटें द्यायला कुणी कमी करणार नाहीं.

आणि मी तरी अप्रस्तुताचें प्रवचन कसें करीन ? 'कवि होण्याची सगळ्यांचीच अपेक्षा नसणार' ह्या विधानाचा हा चलनी भाषेंतील फक्त लोकप्रिय विस्तार होय. लेखण्या मोडणें सोपें असलें तरी तरवारी घेणें किती अवघड आहे हें (खाडिलकरांच्या) लक्ष्मीधरानें चांगलें समजावून दिलें आहे. मनांत येतांच फाउण्टन पेन्स सान्दीकोपऱ्यांत फेकून देतां येतील, पण बंदुका खांद्यावर धारण करणें तितकें सुलभ नाहीं. किंवा एक वेळ हें सगळें धारण करणें – म्हणजे, वेष धारण करणें – सोपें आहे. (कारण, घराला जसें फर्निचर तसें पोषाखाला फाउण्टन पेन 'शोभादायक असे अलंकार;' आणि शोभा म्हणून बंदुकही धारण करायला येईल). पण त्याचा उपयोग काय ? मोरोपन्तांची एक उक्ति सर्वांना माहीत आहे; त्यांनीं म्हटलें आहे –

सहाय्य असिला असें तरिच शत्रुला मारवे

हातांत नुसती तरवार घेऊन काय उपयोग ? शत्रुनिर्दालनासाठीं ती पेलणारें, ती वळविणारें, ती लीलया नाचविणारें मनगट तिच्या मुठीमागें हवें; आणि मनगटालाही निधड्या छातीचा आधार हवा. आणि हा न्याय जसा खड्गाला लागू तसा तो लेखणीलाही लागू – वाणीलाही लागू. लेखणी हातीं धरतां आली तरी तिलाही नाचविणारें मागलें मनगट तयार पाहिजे – प्रभावशाली पाहिजे. वाङ्मय म्हणजे लेखन असा जरी सर्रास अर्थ रूढ असला तरी लेखणी-प्रमाणें वाणीही वाङ्मयांत समाविष्ट करावयाला हरकत नाहीं. आणि लेखणीला व वाणीला शस्त्राचा प्रभाव प्राप्त व्हायला तसें सामर्थ्य आधीं संपादन करायला हवें. वाङ्मय–मण्डळाच्या घटकांना हें तर सांगायला हवें ना ?

ट ला ट व री ला री जुळविण्यानें, लोक जरी 'ही व्यक्ति काव्य करणारी आहे' असें म्हणूं लागले, तरी कवि–पदवीप्रत पोंहोचायला त्या 'ट' व 'री' ला प्रसवणारी लेखणी प्रचीतीच्या विद्युत्शक्तीनें भारलेली पाहिजे. नाहीं तर ती वाङ्मय–निर्मिती म्हणजे नुसती उसनवारी ठरेल. दुसऱ्यांचीं अपत्यें अंगाखांद्यावर खेळवण्यानें 'अपत्यवत्सल'ता येत नाहीं. प्रचीतीशिवाय-पोटतिडकीशिवाय उमटलेला बोल म्हणजे पोपटपंची. तो पोपटपंचीचा बोल लोकांच्या अन्तःकरणाला जाऊन भिडत नाहीं. मग तो बोल गोष्टींत असो, कवितेंत असो किंवा व्याख्यानांत असो. इतकेंच नव्हे तर, व्यवहारांत देखील आपल्या बोलाला मोल यावें असें वाटत असेल तर त्या बोलामागें सामर्थ्य हवें. सामर्थ्याशिवाय काढलेला बोल म्हणजे नुसता वायबार; त्यानें पांखरें उडून जातील, पण शिकारीचें श्रेय मिळणार नाहीं, पराक्रमाची प्रौढी मिरवितां येणार नाहीं.

अशा विचारांचें भ्रमण मनांत चालूं असतां, शेवटीं व्यासपीठावर उभे राहावयाची वेळ आली. आणि अशाच विचारांच्या पूर्व अनुसंधानानें बोलूनही गेलों की—

मित्र हो, मोठे वाङ्मयोपासक होण्याची आपली आकांक्षा असो किंवा नसो, मराठी वाङ्मयांत मोलाची भर घालण्याचें आपलें उद्दिष्ट असो किंवा नसो; पण वाङ्मय–मण्डळाच्या उद्घाटनाचे आजचे साक्षीदार म्हणून तुम्ही

सर्वांनीं एक लक्षांत ठेवावें कीं, वाङ्मयावाचून व्यवहार आडणार आहे. बोलेल त्याचीं गाजरें खपतील, नाहीं त्याचीं केळींही खपणार नाहींत, हा व्यवहार-कोशांतील बाजारी दण्डक वाङ्मयाची प्राथमिक महति सांगतच आहे. पण नुसता त्यावरच माझा भर नाहीं. वाङ्मयाचा प्राण शद्बांत आहे आणि शद्ब हे निराकार भावनेचे–अमूर्त विचाराचे सगुणरूप अवतार आहेत. हे अवतार जन्माला आपणच घालतो. पण त्यांची अवज्ञा जर आपण केली तर आपला सर्वस्वविनाश ठरलेला आहे. शद्ब उच्चारणारी जीभ बत्तीस दाताच्या पहाऱ्यांत आहे. ती जोपर्यंत नीट नांदत आहे तोपर्यंत तिचेंही संरक्षण आहे आणि दातांचेही संरक्षण आहे. पण तीच वेडीवांकडी गेली तर त्या दांतांत सांपडली जाते. दुसऱ्यावर ती रोखली असेल –विवेकानें आणि सावधगिरीनें रोखली गेली असेल तर ती प्रतिपक्षाचे दांत पाडते. उलटपक्षी अविवेकानें जर ती रोखली गेली तर स्वत:च्या पहारेकऱ्यांच्या ( म्हणजे आपल्याच दांतांच्या) विध्वंसनाला कारणीभूत होते. दुर्वास–अम्बरीषाचे आख्यान तुम्हांला माहीत असेलच. दुर्वासाने अम्बरीषावर भयंकर कृत्या सोडली. पण त्या प्रसंगीं अम्बरीषाचा अपराध नव्हता. तेव्हां, त्या भगवद्भक्ताची पुण्याई पुढे ठाकली व तिनें त्या कृत्येला परतवली. परतवलेली कृत्या जन्म-दात्यावरच उलटली.* दुर्वासाला पळतां भुई थोडी झाली ! इतकेंच नव्हे तर देवलोकींही त्याला कोणी त्राता भेटला नाही. शेवटी, दांतीं तृण धरून, त्याला अम्बरीषाचेंच पाय धरावे लागले आणि अविचारानें उच्चारलेल्या शापवाणीनें जन्माला घातलेल्या कृत्येपासून आपला बचाव अत्यंत लाजिर-वाण्या रीतीनें करून घ्यावा लागला. सारांश, शद्ब उच्चारतांना जपायला हवें. ‘ तारण मारण । जिव्हेच्या आधीन ’ ( बायबल ).

तुम्हांला शेजाऱ्यांशीं वागायचें आहे, तुम्हांला वरिष्ठांपुढें उभे राहायचें आहे, तुम्हांला कनिष्ठांशींही प्रसंग पडणार आहे. ह्या सर्व संबधांत तुमची वाणी व लेखणी अशी चालली पाहिजे कीं, तिची अवज्ञा करण्याची कल्पना कोणाच्याही मनांत येतां कामा नये; इतकी ती प्रभावशाली असली पाहिजे.

---

*** प्रासंगिक सोयीसाठीं थोडा फेरफार केला आहे; पुराणिकांनीं क्षमा करावी.**

सिंहगडचा इतिहास तुम्हां सर्वांना ठाऊक असेल. सूर्याजी मालुसरे एका वाङमय – मण्डळाचा नामवंत सदस्य होता आणि वक्तृत्वाच्या चढाओढींत भाग घेऊन त्यानें पारितोषिकें मिळविलीं होतीं, असें अजून कोणाही इतिहास-संशोधकानें शाबीत केलें नाहीं. पण तान्हाजी मरून पडल्यावर सगळे मावळ – मराठे शिपाईगडी कचदिल होऊन, शत्रूला पाठ दाखवून आल्या वाटेनें पळून जाण्यासाठी कड्याकडे धावू लागले; तेव्हां त्या कड्यावरचे दोर तत्परतेनें तोडून टाकून, सूर्याजी त्यावेळीं त्या पळपुट्यांना उद्देशून जे शब्द बोलला ते इतिहासांत नमूद आहेत. "नादान भेकडांनो, जातां कुठं? तुमचा बाप तिकडे मरून पडला असताना भागूबाईसारखे पळून जाता?" ह्या अर्थाच्या शब्दांनीं प्रारंभ करून त्यानें जें वक्तृत्व केलें, त्यामुळें सर्व मावळे वीर परत शत्रूवर तुटून पडले. कोंडाण्याचा 'सिंहगड' व्हायला, अशा रीतीचें त्याचें निदानीचें वक्तृत्वही कांही कमी कारण नाही!

तुम्ही–आम्हीं भाण्डतांना एकमेकांचे आईबाप हरघडी उद्धारतो. पण ती वाणीची केव्हढी विटंबना आहे. कोणाचा बाप कोणी काढावा आणि केव्हां काढावा, ह्याला तशीच अधिकाराची माणसें हवींत आणि निकराची वेळ पाहिजे. त्यावेळी शिपायांचा 'बाप' काढणाऱ्याच्या वाणी पाठीमागें एवढें प्रचंड सामर्थ्य होतें की, 'कुणाचा रे बाप काढतोस' असें त्या सूर्याजीला उलटून विचारायला कोणाची जबान धजावली असती? 'अरे' म्हणायला तोच स्वयंसिद्ध अधिकारी की, ज्याला मान वर करून 'का रे' म्हणून पुसण्याची प्राज्ञा कोणालाही व्हायची नाहीं. लेखणीचा फटकारा तोच खरा कीं, अखिल ब्रह्मांडांतील शस्त्रास्त्रांनींही जो पुसला जाणार नाहीं – शस्त्रास्त्रांच्या खण्खणाटांतून पडणाऱ्या ठिणग्यांनीं भडकलेल्या अग्नीत जो जळला जायचा नाही! जळेल काय तो फक्त कागद! पण तीं अक्षरें प्रळयाग्नीच्या ज्वाळांतूनही अक्षरच राहतील. वाङमयमण्डळाच्या सदस्यांनीं आपल्या वाणीला व लेखणीला ह्या सामर्थ्याची जोड लाभेल असल्या चारित्र्याचें ध्येय डोळ्यापुढें ठेवावें. तरच "खड्गाहूनही बोरू बलशाली आहे" ह्या सुभाषिताची प्रचीती येईल.

---

# थोडे निःसंग व्हा निःसंग ! : १०

"फिरायला येता का ? चला कीं जरा येऊं फिरून. घरीं तरी बसून काय करताय ? " असें मला कोणीही विचारलें, कितीही आळवलें तरी त्याला माझा स्पष्ट नकार तत्काळ मिळायचाच. उत्तर – प्रत्युत्तराबाबत मी अगदीं तत्पर, फोडणीप्रमाणें हजरजबाबी आहे, अशांतला भाग नाहीं. संदिग्ध बोलायचें, रेंगाळत उच्चार निघायचा, हा तर माझा दुर्गुण. हा दिसायला किरकोळ असला तरी नित्याच्या सहवासांतल्या लोकांना फार मोठा वाटायचा. ते माझ्यावर ह्याच गुणाबाबत चिडायचे ! 'फिरायला चला' म्हणणारांच्या बाबतींत मात्र न–कार देण्याचा चलाखपणा मी कसा दाखवीत असे, ह्याचें स्नेह्या–सोबत्यांना, डांबरांतून साखर किंवा दगडांतून ठिणगी निघाल्यासारखें आश्चर्य वाटे.

'तुम्ही त्यांच्या गुळमुळीत बोलण्याची चेष्ठा करीत असाल; मग कशाला येतील ते तुमच्याबरोबर' असा कोणी माझी कड घेतल्यागत बोले.

"अरे, माळरानावर मोकळ्या हवेंत फिरायला जायचें ? – घरांतली ऊब सोडून ? तुमच्यासारखा अरसिक नाहीं तो" कुणीसा एकदा असा खोडसाळपणा केला. बोलण्यांतला खोडसाळपणा हा स्वानुभवाचा प्रतिध्वनि असतो, असें मी मात्र, त्याच्या आधूनमधूनच्या गैरहजेरीमुळें हेरून ठेवलें होतें.

शेवटीं, प्रकरण निकालीं काढायच्या आविर्भावानें श्री. व्यवहारपुरकरांनीं सुभाषितांत अभिप्राय दिला 'एक न–कार छत्तीस गुण ! कशाला लागतां त्याच्या नादीं ? चला आपले ! '

आणि ह्या अभिप्रायांत वावगें तरी काय आहे ? खरेंच आहे, एक नकार देण्यांत, मोजलीं तर छत्तीस सुद्धां कारणें सांपडतील. पण, तीं त्यांना बोलून कुठें दाखवीत बसा ? आणि मला बोलायचें तरी तसें कुठें जमतंय ? म्हणून तर त्यांचीं बोलणीं ऐकून घ्यावी लागतात. तें कांहीं नाहीं; त्यांचीं तोंडें बंद करण्यासाठीं आपलें म्हणणें एकदां त्यांच्यापुढें लेखींच माण्डलें पाहिजे, असा निश्चय करून मी मेजापाशीं जाऊन बसलों.

'मित्र हो, तुम्ही मला फिरायला चला म्हणावं आणि मी नाहीं

म्हणावं — मला फिरणं आवडत नाहीं असं कां वाटतं तुम्हांला? घराच्या उबेचा मला इतका हव्यास आहे असं समजतां? बिलकुल तसं नाहीं. तुम्हांला कल्पना नसेल इतका मी फिरण्याचा शोकी आहे. पण तें तुमच्या संगतींत तुमच्या पद्धतीनें फिरणें मला नाहीं आवडायचें. तुमच्या गप्पागोष्टी म्हणजे 'साहेब… माझी नोट…फलाण्याचा ड्राफ्ट… B. C. S. R.…ऑडिट नोट, G. R. ह्या हरभऱ्याच्या तोबऱ्या! कचेरींत काय पुरते कान किटलेले नसतात म्हणून तुमच्याबरोबर फिरायला येऊं हा काथ्याकूट करायला?

आपले ते रामभाऊ. तो एक दुसरा नमुना आहे. रोज फिरायला जातो. घड्याळाकडे पाहून उठायचं, पायाखाली दिसूं लागलं कीं घराबाहेर पडायचं, 'सकाळ' अर्धा आणा' ह्या पार्श्वसंगीतावर चाल धरायची, दूधवाल्याच्या भिकर्यानें ह्याला मागें टाकायचं, आणि नदींत धारेला ज्याप्रमाणें एकादा ओंडका लागतो त्याप्रमाणें पर्वतीला जाणाऱ्या पायदळाच्या प्रवाहांत मिसळून, ढकलत, गिरक्या खात वरपर्यंत थडकून, गरंगळत परतायचं, असा त्यांचा नेम आज कैक वर्षं अव्याहत चाललेला मी पाहतों आहे. साताऱ्यास बदलून गेले तेव्हां पर्वतीऐवजीं खिडींतला गणपती! ह्या भौगोलिक फरकानें त्यांच्या मनःफलकावर काय फरक घडला? हेंही मी फिरायला जाणें समजत नाहीं. 'आज तांबडं फुटलं त्यावेळचो काय अवर्णनीय शोभा होती' असे कुणाचे उद्गार, फिरून आलेल्या रामभाऊंच्या जर कानावर पडले तर कोणी तरी चंदीचंदावरकडचें हें सृष्टिसौंदर्य वर्णन करीत असेल अशी ते आपली समजुत करून घेऊन चालूं लागतील. 'करवंदीच्या जाळचा अगदीं फुलून गेल्यामुळें असा कांहीं रानांत सुगंध दरवळलेला असतो कीं'– रामभाऊंच्या तोंडून हे उद्गार कधींच यायचे नाहींत. 'आज फिरायला जातांना आम्ही भारद्वाज पाहिला; मिष्टान्न–लाभ होतो का पाहिलं पाहिजे' असें जर कोणी रामभाऊजवळ म्हणाला, तर तें म्हणतील, 'भारद्वाज पाहिला म्हणे! काय थापा मारतोय लेकाचा! भारद्वाज दिसायला काय मानस–सरोवरावरूनच सहल करून आलात वाटतं रामपाऱ्यांत! पारंब्याएवढ्या मिशा आल्या तरी मिष्टान्नासाठीं मिटक्या मारायचा पोरकटपणा अजून जात नाहीं अं!" पण छे; मिशांना ही उपमासुद्धां सुचायला त्यांच्या मनाची तशी

घडण कुठें आहे ? सारांश, त्यांच्या पंथाचा तरी मी कसा अनुयायी होऊं ?

घरांत, मण्डईत, कचेरींत, क्लबांत जी मण्डळी तुमच्याबरोबर असतात त्यांतलीच कोणी ना कोणी तरी तुमच्या खनपटीला बसून, रोजच्या रोज एक ठराविक फेरफटका मारायला नेऊं लागली तर घर, मण्डई, कचेरी, क्लब ह्यांच्यापेक्षां त्या फिरण्यांत नाविन्य तें काय राहिलं ? आणि – राग येऊं देऊं नका – घाण्याला जुपलेल्या बैलानं तुम्हाला आपले सगोत्र कां समजू नये ?

प्रकृती सुधारण्यासाठीं फिरायला जात जा हा उपचार प्रथम ज्या डॉक्टरानें रूढ केला असेल त्यानें काय नुसती मोकळी हवा आणि पायपीट एव्हढ्यावरच भिस्त ठेवली असेल ? छे, डॉक्टर रसिक असायला पाहिजे आणि मनोव्यापार–विशारदही असायला पाहिजे. पोपटपंची करणारे डॉक्टर सोडून द्या; पण ज्यानें हा उपचार प्रथम सांगितला त्यानें आपली रसिकता आणि मनोधर्म–निरीक्षणशक्ति हीच व्यक्त केली अशी माझी खात्री आहे. रोजच्या रोज तींच माणसं, तेच देखावे, तेच विषय, तेच विचार ह्यांनी जीविताला सांडपाण्याच्या तळ्याचें – सांजसकाळ त्याच त्या तारखांबांचं प्रतिबिंब पाहणाऱ्या तळ्याचं रूप येतं. सांचा जिवंतपणाच्या विकासाला मारक होतो. म्हणून त्या डॉक्टरानें फिरायला जायचा उपचार शोधून काढला.

हें सृष्टिसौंदर्य खुलें तुम्हाला
ठेवीतसे देव पाहावयाला

अनेक मानसिक व्याधींचा निरास करायचा गुण सृष्टीच्या विलासांत आहे. सृष्टिसौंदर्य हें एक दिव्य औषध आहे – एक पौष्टिक टॉनिक आहे. पण आम्ही फिरण्यांत देखील विषय – माणसं – देखावे इत्यादिकांचं तेंच – तें – पण अखंड राखलं, मनाला व डोळ्यांना नाविन्य व सौंदर्य पाहूं दिलं नाहीं आणि डॉक्टरला पराभूत केलं ! मूळचा हेतु कसा विफल करावा तेवढं आम्हां माणसांना नेमकं साधतं. तीर्थयात्रांचा पुरस्कार करणाराचा मूळ हेतु देखील, मुण्डण करून निरनिराळ्या ठिकाणच्या कुंडांत आणि नद्यांत बुचकळ्या मारण्यास सांगणें व तर्पण करावयास लावणें एवढाच असेल काय ? असला तरी तो वरकरणी ! परमार्थाचं केवळ मिष ! खरें म्हणजे त्या मिषानें आम्हां कूपमण्डुकांना परम स्वार्थ साधायचे मार्गच त्या पुरस्कर्त्यांनीं मोकळे

करून दिले असावेत. पण स्वेच्छाचाराला सुद्धां चाकोरींत आणून बसविणें हा आमचा अभिजात गुण !

प्रपंचमंदिराच्या महाद्वारावर अनंतफंदीनें बऱ्याचशा नकारघण्टा बडवीत ठेवलेल्या तुम्हास माहीत असतीलच. "बिकट वाट वहिवाट नसावी, धोपट मार्गा सोडुं नको" ही त्यांतली पहिली घंटा. ह्या पहिल्याच घण्टेनें माझें डोकें इतकें भणभणतें कीं, पुढचा सगळा घण्टारव माझ्या कानांत शिरूंच शकत नाहीं. धोपटमार्गाचा हा पहिलाच धडा ज्यानें घातला त्यानें अनंत-फंदी हें नांव मिरवणें सुद्धा गुन्हा होता. आत्मनिरीक्षणांत ज्याला एवढीही विसंगती उमगली नाही, त्यानं इतरांना धडे द्यायला धजावं हें आश्चर्यच नव्हे का ? अन् त्याचं जर हें लोकांना सांगायपुरतंच ब्रह्मज्ञान असेल तर मग तें इतरांनीं तरी ऐकावं कां म्हणून ?

धोपटमार्गाचा कित्ता कोलंबसानें गिरवला असता तर अमेरिका खण्ड अज्ञातच राहिलं असतं. निरनिराळी वाट रोज धरून, वेगवेगळें विश्रांति-स्थान शोधण्यांत मला कोलंबसाच्या आनंदाची अनुभूति येते. सीध्या रह-दारीच्या रस्त्यावर माणसाच्या टकरा चुकविणं हाच एक मुख्य उद्योग करावा लागतो. आपलं पाऊल, आपला पोषाख, आपला दर्जा, आपलं शील हीं सगळीं कर्मठ सोंवळ्या ब्राह्मणाच्या बुजरेपणानें सांभाळायची — चुकून कुणाचा धक्का लागेल कीं काय ह्याच भीतीचं सारखं ओझं वाहायचं —मोकळ्या अंगानं फिरायला बाहेर पडणारांनीं काय हा कैदखाना आपल्या भोंवतीं उभा करून घेतलाय ? छे छे; मानवी जिणं हाच एक बंदीवास आहे, तेवढा पुरवला ! फिरण्याच्या बाबतींत तरी मला मुक्त राहूं दे.

फिरायची एकच एक ठराविक वेळ आणि ठराविक वाट मला मुळींच मान्य नाहीं. कधीं माळावर भटकावं तर कधीं नदीकांठच्या झाडाझुडपांतून वाट काढावी. कधीं जरी कांठाप्रमाणें शोभणाऱ्या सपाट पाऊलवाटेवरून निर्बंधपणानें चालावं तर कधीं मेघखंडयुक्त आकाशासारख्या उंच-सखल खडकाळ प्रदेशांतून उड्या माराव्यात. कधीं एकाद्या दगडाला टेकून बसून ह्या झुडपावरून त्या झुडपावर कोळ्यांनीं नुसतें आडवेच लोंबकळत सोडलेले नाजुक धागे पाहात पाहात, वायूच्या मंद हेलकाव्यांनीं सूर्याच्या कोवळ्या किरणांत

ते चमचमूं लागले म्हणजे पुष्पहारांतील कलाबतूच्या तंतूंचा आभास अनुभवावा, तर कधीं कातळाच्या शय्येवर उघड्या डोळां झोपेचं सुख अनुभवीत अंधाराच्या आरपार मच्छरदाणींतून चांदण्यांची स्वप्नमाला गुंफावी. स्वताला विसरणें म्हणजे फिरणं अशी माझी व्याख्या आहे.

नाकांत तपकिरीची चिमुट कोंबायची आणि फिरायला बाहेर पडायचं! खिशांतील विड्यांची डबी भरगच्च भरून घ्यायची आणि मगच पाऊल बाहेर टाकायचं ! आपले व्याप, आपले ताप, आपलीं दुःखें, आपलीं व्यसनें आणि आपलीं किल्मिषें व कारस्थानें, ही सारी प्रभावळ घेऊनच जर दिवसाकाठच्या सहलीला निघायचं तर त्या सहलीमुळें श्रमाच्या ओझ्याव्यतिरिक्त आपल्या पदरांत काय पडणार ? श्रम ते खरे कीं ज्यांचें ओझें वाटणार नाहीं. श्रम ते खरे कीं जे जड झालेला जीव उत्साहानें हलका करतात.

निसर्गानें शुद्ध हवेची संजीवनी उदंड वाहती ठेवली आहे. कळप करून राहण्याच्या प्रवृत्तीनें ती संजीवनी मनुष्य प्राण्यानें नासून टाकली आहे. तेव्हां, नाना तऱ्हेच्या नासक्या वाफाऱ्यांनीं दूषित झालेल्या वसाहती मागें टाकून, शिवारांतील विशुद्ध संजीवनीच्या आस्वादासाठीं जातांना, बरोबर आपलीं सारीं व्यसनें आणि साऱ्या कर्मकटकटी घेऊन जाणें म्हणजे, तेच आपले आपण तसेच्या तसेच राहून, फक्त पार्श्वभूमि बदलणें होय. पण –

बदल हवा तो, पार्श्वभूमीचा नसून, आपल्या आपलेपणाचा ! व्यावहारिक आपलेपणा आपल्याला विसरायला हवा; आणि विस्मृतीचा तो 'योग' साधायला सोपें जावें म्हणून नित्याच्या बाहेरील पार्श्वभूमीत जायचें. कारखाना काय, पेढी काय, कचेरी काय किंवा खुद्द घर काय – ह्यांना कोंदट तळघराचें रूप आलेलें असतें. त्या कोंदट तळघरांत बावीस घंटे नांदून गुदमरूं लागलेल्या आत्म्याला ताजी मोकळी हवा असलेली निर्लेप पार्श्वभूमि मिळाल्याशिवाय विस्मृतीचा 'योग' साधता येणें दुर्घट आहे. आपण आपलीं सारीं व्यसनें आणि कर्मकटकटी आणि माणसें ह्यांच्या जंजाळांतून व कचाट्यांतून बाहेर पडूं शकलों नाहीं तर ताजी व मोकळी हवा अंगाभोंवतीं खेळूनही निष्फळच.

एकट्यानें फिरायला जाण्यानें, विवंचनांचीं जाळ्या – जळमटं आणि व्यसनाची कॅजळं झाडून – झटकून शुचिर्भूतपणें एकट्यानें फिरायला जाण्या–

नेंच अनंतांतील संगीतांतला एकादा सूर आपल्या कानांना ऐकूं येईल. रम्य कल्पनेची अस्मानपरी एकांताशिवाय आपल्याला कशी बिलगेल? सदेह स्वर्गाला नेणारें विचार – विमान एकांताच्या अभावीं अवतरत नाहीं.

हें समाधिसुख घरबसल्या मिळायची आतां सोय उरली नाहीं. सोय होती ती आम्ही नष्ट केली आहे. आम्ही बुद्धिवाद्यांनीं देवपूजा हें थोतांड आहे असें ठरवून, देव आडगळीत टाकले आणि आडगळ देवघरांत भरली. घरांतल्या घरांत समाधिसुख देणारा तो सवता कोपरा आम्ही मोडून टाकला. अर्थात् देव नसला आणि देवपूजा थोतांड असली तरी समाधिसुखाची, अलिप्तपणाची, एकांताची आत्म्याला असलेली आवश्यकता कांहीं नाहींशी होत नाहीं. म्हणून ( देवघराच्या अभावीं ) घराबाहेर – गांवाबाहेर धूम ठोकायला हवी. फिरायला जाण्यांतला हा परम अर्थ आम्ही लक्षांत न घेतां, सारें लटांबर घेऊन बाहेर पडतों. देवघराची कोठी करून टाकली; आतां निवांत शिवाराचा बाजार करीत आहोंत.

आपल्या व्यापतापांची व आप्तस्वकीयांचीं लोडणीं गळयांत बाळगून फिरायला जाणें म्हणजे फिरणें नव्हे. 'लोडणीं' म्हटल्याबद्दल रागावूं नका. तुमची किंवा तुमच्या परिवाराची हेटाळणी मला करायची नाहीं. 'लोडणीं' ह्या शब्दाला तुमची हरकत असल्यास 'वस्त्राभरणं' म्हणतो. पण [ प्रत्येकाला पटणारी एक अनुभवाची खूण सांगतो ] वस्त्राभरणं सुद्धां कांहीं एक प्रकारच्या सुखसमाधींत नको असतात– त्यांची लुडबूड एकरूपतेला विघातक होते. नाकं मुरडूं नका ह्या दृष्टांताला. बरं, राहूं द्या तो. पोहायला पडतांना तुम्ही ठेवता का सगळा पोषाख तसाच अंगावर? पोषाख घालून पोहण्यांत शिताफी नाहीं असें नाहीं. विद्यार्थीदशेंत असतांना तसल्या शर्यतींत भाग घेऊन मी बिल्लेही मिळविले आहेत कधीं कधीं. पण विहार म्हणजे शर्यत नव्हे. आणि विहाराचे वेळीं शक्य तितकीं वस्त्रप्रावरणें आपण उतरून ठेवून उडी घेतो. जलवंतीच्या परिरंभणांत देखील वस्त्रालंकारांची अडचण होते. फिरणें मी ह्याच कोटींतलें समजतो. आणि म्हणूनच एकरूप होण्याला– आत्मानंदांत विलीन होण्याला ज्याचा व्यत्यय येईल असं कांहींही आपणाबरोबर नसावें असा माझा कटाक्ष. मित्रहो, दिवसाकांठीं तुम्हीही थोडे निःसंग व्हा निःसंग.

---

## वस्तुसंग्रहाची वासलात : ११

**वस्तुसंग्रहाचा** नाद पुष्कळांना असतो. अशा नादिष्टांच्या गोष्टी आधुन-मधून माझ्या कानावर येतात आणि क्वचित कुणाच्या संग्रहांतील एकाद्या वस्तूला अफाट किंमत आल्याची बातमीही वर्तमानपत्रांत वाचायला मिळते. मलाही अशा प्रसंगा-प्रसंगांनीं त्या छंदाची मोहिनी पडूं लागली. तशांतच—

एकदां एका माझ्या मित्रानें मला आपल्या घरीं बोलावलें. त्यानें आपलें घर म्हणजे एक ऐतिहासिक वस्तुसंग्रहालयच करून टाकलें होतें. समाजांतील मानलोलुप प्रतिष्ठितांनीच केवळ नव्हे तर प्रान्तिक सरकारच्या सर्वोच्च हुद्देदारांनीं देखील त्याच्या घरगुती संग्रहालयास भेटी दिल्या होत्या; आणि त्यांचीं प्रशंसापत्रें त्यानें मला अभिमानानें आणून दाखविलीं होतीं. अर्थात्च आतां मलाही माझें मित्रकर्तव्य पार पाडणें अगदीं अपरिहार्य झालें होतें. आणि मी जाऊन पाहिलें तों खरोखरीच एका व्यक्तीच्या छान्दिष्टपणाला केवढें प्रचण्ड स्वरूप आलेलें दिसलें. भूर्जपत्रें व ताम्रपट; जुनीं पुराणीं भाण्डीं नि नाणीं; अडकित्ते व कलमदानें; वस्त्रें, शस्त्रें आणि चित्रें यांचें तें प्रदर्शन म्हणजे आमच्या पूर्वजांचा हौशी, विलास, कलाप्रेम आणि सौन्दर्य-दृष्टि यांचा जसा तो आरसे-महाल झाला होता तसाच तो माझ्या मित्राच्या ( रंगराव म्हणतों मी त्याला ) हौशीचाही अजबखाना झाला होता. आणि एकीकडे तें पाहतां पाहतांच मला असेंही आणखी दिसून आलें कीं, रंगरावच्या कुटुंबांत माणसांचा शुकशुकाट असून, त्याला आपल्या आयुष्याचे बहुतेक दिवस आणि दिवसांचे बहुतेक तास खर्चावेच लागतील इतकी सामान्याप्रमाणें पोटाची विवंचना तीव्र नव्हती. त्यामुळें रिकामा वेळ जसा विपुल मिळे, तसाच रिकामा दामही त्याच्या खिशांत पुष्कळ खुळखुळे. आपल्या फालतू पैशाचा व आयुष्याचा इतका अभिनंदनीय उपयोग केल्याबद्दल मी त्याची पाठ थोपटून निरोप घेतला.

रंगरावाची पाठ थोपटतांना माझ्याही अंगांत त्याच्या छान्दिष्टपणाचा संचार झाला. मण्डईची वाट धरतां धरतां मीहि निर्धार केला कीं, आपणही

आपल्या ऐपतीप्रमाणें पुराण वस्तूंचा असाच संचय करायचा !

पण सुरवात कशापासून करायची ?

ह्या प्रश्नाचें उत्तर मण्डईंतच मिळालें. भाजी खरेदी करून रुपयां-तील उरलेले पैसे माळणीकडून परत घेतले. ते मोजन पाहतांना त्यांत एक खोटें नाणें आढळलें. त्याच्या एका बाजूचें चित्रण असें होतें;— पार्श्वभूमींत सूर्य, त्याचेपुढें तरवार घेतलेला सिंह, सभोंवतीच्या वर्तुळाकृति हारांत शिरो-भागीं मुगुट आणि सिंहाच्या पायाखालीं, मला ठाऊक नसलेल्या लिपींत, (बहुशा) वर्षसंख्या. तें न चालणारें नाणें मी तिला परत करायच्या बेतांत होतों तोंच नाणीं-संग्रहाची कल्पना चक्ककन् चमकली. लगेच आनंदानें मी मोड तशीच खिशांत घातली. खोटें नाणें सफाईनें खपविल्याचा माळणीला आनंद झाला असला पाहिजे ! प्रेमानें प्रेम वाढतें एवढेंच सुभाषितकारांनीं सांगितलें आहे; पण आनंदानें आनंद वाढतो ह्याचाही मला जातां जातां साक्षात्कार झाला.

ह्यापुढें मी कधींही मोड बघून घेण्याचे फंदांत पडेनासा झालों. खोटीं नाणी खपविण्याची चुटपुट सगळ्यांनाच असते. खोटेपणा पदरीं नको, असा कांहीं त्यांचा बाणा नसतो किंवा जमलेल्या खोट्या नाण्यांपायीं व्यापार निखालस तोट्याचा होतो असेंही नाहीं; पण स्वतः फसलेला माणूस दुसऱ्याला फसवील तेव्हांच त्याची मळमळ नाहींशी होते, त्याचें मन हलकें होतें. अशा-रीतीनें मी लोकदृष्टीनें फसूं लागलों. ही माझी डोळेझांक त्यांच्याच पथ्यावर पडली असें नव्हे तर माझ्या नाणीं-संग्रहाच्या पथ्यावर पडली. कितो विजातीय नाण्यांचा भरणा माझ्या घरीं अनायासें होऊं लागला !

न चालणाऱ्या नाण्यांच्या संगतींतच चालू नाण्यांची देखील मी भरती केली. खोट्यांच्याबरोबर खऱ्यांची विटंबना कां, भूतकाळाबरोबर वर्तमान-काळाची ही लुडबुड कां, असे लोकांना प्रथम प्रथम प्रश्न पडत. पण जेव्हां का व्हिक्टोरिया व सातवा एडवर्ड ह्या छापाचीं चांदीचीं नाणीं कांहीं मुदती-नंतर चालणार नाहींत, अशीं एकामागून एक फर्मानें सरकारनें काढलीं तेव्हां कुठें लोकांना माझ्या दूर-दृष्टीचें कौतुक वाटूं लागलें आणि नाणीं दुर्मिळ व्हायला साम्राज्यें लयालाच जायला लागतात असें नाहीं, हें कळून

चुकलें. संशोधन आणि उत्खनन करून भूतकाळाला जोडणारा बोगदा तयार करणारालाच ही दूरदृष्टी असते कीं वर्तमान काळाचें भवितव्य देखील भूतकाळासारखेंच व्हायला फारसा काळ लागत नाहीं ! इतिहाससंशोधकाच्या जोडीनें आणि आढ्यतेनें मीही आतां लोकांना हें ज्ञान सांगूं लागलों.

ह्याच छांदिष्टपणाचा प्रकार म्हणून नव्हे, पण सहजासहजीं त्यांत ढकलतां येणारा दुसरा एक भाग घरांत आयताच विलसत होता. तो म्हणजे, हस्तव्यवसायनैपुण्य व क्रीडापटुत्व दाखवून मी जिंकलेलीं रौप्य-पदकें व पेले यांचें कपाट. मित्रांनीं देखील गुण-गौरवार्थ दिलेल्या चांदीच्या भेट वस्तूंची–तबकें, फोटो फरेम्स, दौती ह्यांची त्या कपाटांत गर्दी होती. ह्या कपाटानें वस्तुसंग्रहाला अभिमानास्पद शोभा आणली, हें काय निराळें सांगायला हवें ?

शंख नि शिंपले हेही माझ्या वस्तुसंचयांत जमा होऊं लागले. त्यांच्या वरचें निसर्गनिर्मित नक्षीकाम, त्यांच्या अन्तरंगांतील तुकतुकीत रंगकान्ति आणि त्यांचे निरनिराळे आकार नि कांटे व फाटे, ह्यांचा मोह कुणाला पडणार नाहीं ? ह्या विभागाला घरच्या देव्हाऱ्यांतल्या शंखापासून सुरुवात झाली हें सांगायला नकोच. गांवच्या नदीकांठीं मिळालेल्या शंखशिंपल्यांनींही बरीच गर्दी केली. कवड्यांचेही कांहीं नमुने त्यांत दिसूं लागले. कोणी म्हणत, कीं इतक्या क्षुल्लक वस्तु कशाला जमवायला हव्यात. पण–

परि प्रभुहि वस्तुला सकल संग्रहीं ठेविती
गुणा न म्हणता उणा अधिक आदरें सेविती

अशीच संग्रहकाराची मनोवृत्ति झालेली असते ती इतरांना कशी कळणार ?

चित्रसंग्रह हा माझ्या छान्दिष्टपणाचा आणखी एक घवघवीत पैलू. प्रथम प्रथम कार्ड-साईज चित्रांनीं आरंभ झाला. रस्त्याकडेला वर्दळीच्या पायधुळीनें माखलीं जाणारीं रंगीत कार्डें विकत घेऊन मी घरीं कौतुकानें जोपासूं लागलों सौंदर्यदृष्टी होतीच; तिला संग्रहदृष्टीची बाधा झाली. वाचायला आणलेल्या दुसऱ्यांच्या मासिकांतील चित्राभोंवतीं कात्री चालवूं लागलों. इतरांना पोरकटपणा वाटावा इतक्या आगत्यानें सिनेमाचीं सचित्र हँडबिलें गोळा करूं लागलों. वाणसवद्याभोंवतींची रद्दी देखील आतां निरखूं

लागलों. चॉकोलेट, साबण व सिगारेट्स ह्यांच्या सोबत मिळणाऱ्या सुन्दर चित्रांच्या मोहानें ह्या वस्तूंची अवास्तव खरेदी करूं लागलों. स्वत: मनुष्य साबण कितीसें वापरील? म्हणून, परिचितांचा असला बाजार करून देण्याचा स्वयंसेवकपणा, चित्रांच्या मोबदल्याच्या आशेनें, मी पत्करला. सिगारेट्सही ओढूं लागलों व स्नेह्यां - सोबत्यांना, त्यासोबतच्या चित्रांच्या दलालीसाठीं, त्या ब्रँडची स्तुतिस्तोत्रें ऐकवूं लागलों. एका व्यसनामागोमाग दुसरींही व्यसनें कशीं गळा धरतात तें मला चांगलेंच कळून आलें. पण व्यसनी लवकर थोडाच सावध होणार? शिवाय, छन्दाचें सात्विक अधिष्ठान असताना?

हौसेला मोल नाहीं! नाण्यांच्या संग्रहासाठीं, चवलीच्या आकाराचें विजातीय नाणें चवलीला, ह्या प्रमाणांत म्हणजे जेव्हढ्यास तेव्हढें मोल द्यावें लागलें. पण चित्रासाठीं त्यांच्या सोबत विकत घ्याव्या लागणाऱ्या वस्तूंचें मोल पडून, व्यसनाधीनताही पत्करावी लागली. हा सौदा जबर महाग! पण संग्रह तर समृद्ध होत होता! जमवलेल्या वस्तूंवर छान्दिष्टाची ममता जडते. ममता महागाईला जुमानीत नाहीं!

कधीं कधीं रंगराव घरीं येई इंद्रमहालापुढें खोपटाची कसली मिजास? तरी पण त्याला मी माझा संग्रह दाखवी; आणि मजजवळचीहि एकदी चीज त्याला अपुरबाईची वाटे- हवीशी होई. मग मला मूठभर मांस चढल्यासारखें वाटे. कुबेरानें कंगालापुढें हात पसरावा! केव्हढं समाधान आहे ह्यांत कंगालाला! मी त्याची मागणी पुरवूं शकत नसे. आपलें अपत्य दुसऱ्याला दत्तक देण्यांत काय दुःख असेल ह्याची त्यावेळीं मला कल्पना येई.

× × ×

यथाक्रम रांगत्या बाळांनीं माझा संसार गजबजूं लागला.

असाच एक दिवस रंगराव मजकडे आला. त्याला ३-४ नाणीं मिळालीं होतीं. माझ्या संग्रहांत तसलीं आहेत का म्हणून पाहण्याच्या जिज्ञासेनें तो आला होता. चिंगी, बनी आणि टिल्लू ह्यांनीं एका खोलीच्या कोपऱ्या-कोपऱ्यांत आपले संसार थाटले होते. त्यांकडे मी बोट केलें. सारा प्रकार त्याच्या ध्यानीं यायला वेळ लागला नाहीं. नाण्यांची वाटणी मुलांनीं आपा-पसांत कधींच करून घेतलीं होती. चित्रांचीही तीच गत. कांहींची विल्हे-

वाट कधींच लागली होती. विद्रुपपणानें चुलीवरच्या शिक्यापासून मागील दाराच्या उकिरड्यापर्यंत तीं विखुरलीं होतीं. रंगराव म्हणाला—

"भल्या गृहस्था, मी मात्र मागितलीं होतीं त्यावेळीं तुला तीं देववलीं नाहींत ! आणि आतां ? –कुठं गेलं तें तुझं छन्दप्रेम ?"

मी म्हणालों, "थांब, तें तसंच आहे ! फक्त कुरवाळायला अन् कोड-कौतुक करायला आतां निराळ्या वस्तू मिळाल्या आहेत एवढेंच !"

तो गप्प बसला. कांहीं वेळानें त्याचें लक्ष चांदीच्या वस्तूंच्या रिकाम्या कपाटाकडे गेलें. तो कांहीं तरी विचारणार असें हेरून मीच म्हणालों, "त्यांतले बिल्ले, पेले वगैरे जिन्नस तुला पाहायचेत का ? ते पाहा त्यांचे अवतार मुलांच्या हातांत, पायांत नि गळ्यांत !...

त्यानें एक सुस्कारा सोडला.

माझ्या अरसिकतेची मनांत कींवही केली असेल त्यानें.

पण कोणाही छान्दिष्टाच्या संचयाची वासलात त्याच्या पश्चात् अशीच नाहीं का लागणार ? वारसांना त्या वस्तूंचें काय प्रेम ? बाजारभावानें येणारें मोल काय तें त्यांच्या हिशेबीं ! लिलावांत त्या वस्तु पांगून जाणार, त्यांची विल्हेवाट लागणार आणि चलनी नाण्यांत त्यांचें रूपांतर होणार. त्यापेक्षां ते वारस बाळरूपानें घरांत खेळत असतांना त्यांना त्या वस्तू आपण होऊन देऊन टाकण्यांतच खरें समाधान आहे, मुलांना त्या घेण्यांत परमावधीचें कौतुक व आनंद आहे आणि त्या वस्तूंचें साफल्य आहे.

माझ्या आयुष्यांत तरी त्या छंदांचें कौतुक मी केव्हां करूं शकलों ? कौतुकाला चिमण्या–गोजिरवाण्या ह्या बालमूर्ति जीवितांत आल्या नव्हत्या तेव्हांच ना ? रंगरावाचा तो अजबखाना तरी कशाचा द्योतक आहे – कशांतून उत्पन्न झाला आहे ? रित्या संसारांत नि रित्या जीवितांत त्याला कुणाचा लळा लागावा ? पुराणवस्तूंचा संचय ! जे भविष्याला जोजवायला असमर्थ आहेत तेच पुराण काळाला कुरवाळतात !

रंगरावानें सोडलेला सुस्कारा ह्याच जाणींवेचा तर नसेल ना ?

---

# दैनंदिनी लिहितांना : १२

दिवसाकांठीं आपली दिनचर्या लिहून काढावी, तीपासून पुष्कळ फायदे असतात, असें सांगण्यांत येतें. आणि कांहीं कांहीं मंडळी नियमानें दिनचर्या लिहितातही. फायदे असतात हें कांहीं खोटें नाहीं. आयुष्याच्या वाटचालींत जे प्रसंग उद्भवतात, ज्या परिस्थितींतून आपण जात असतो, त्यांची त्या त्या वेळीं आपणांस तितकीशी महती वाटली नाहीं तरी कालान्तरानें त्यांना वैशिष्टच प्राप्त होतें. आणि तसें वैशिष्टच प्राप्त झालें म्हणजे त्या गत-काळाचा तपशील आपणांस जितका स्पष्ट ध्यानीं यायला हवासा वाटतो तितका येत नाहीं. त्या घटनांतील कांहीं भागांवर धुरळा चिकटून बसतो, कांहीं धागेदोरे विरून गेलेले असतात आणि रंग उडून चाललेले असतात. मग स्वाभाविकच मनाला चुटपुट लागते. दिनचर्या जेव्हांच्या तेव्हां लिहिलेली असली म्हणजे विस्मृतीच्या भक्ष्यस्थानीं त्या घटना पडल्या तरी, दिनचर्येचीं पानें चाळून त्यांची उजळणी करतां येते, वाङमयस्वरूपांत त्यांच्या प्रतिमा पाहायला मिळतात. आपलें रूप, आरोग्य, वेश कोणत्या वेळीं कसकसें होतें हें पाहण्यास ज्याप्रमाणें त्या त्या वेळच्या छायाचित्रांचा उपयोग होतो, त्याचप्रमाणें आपले मानसिक पेहराव, रूप, आरोग्य हीं लिहून ठेवलेल्या दिनचर्येवरून समजून येतात. आपण विशिष्ट परिस्थितींत कसें वागलों, विशिष्ट कोण्डींतून कसें निसटलों किंवा बनावांत कसे गुंतलों गेलों हें दिनचर्यात्मक लिखाणावरून जाणून घेतां येतें. सारांश, ऐतिहासिक महत्व आहे दिनचर्या लिहून ठेवण्याला.

'आत्मशुद्धीचा एक सोपा मार्ग,' हा दिनचर्यालेखनाचा दुसरा एक विशेष महत्त्वाचा फायदा म्हणून सांगतां येईल. दिनचर्या लिहिणें म्हणजे आपल्या भल्याबुऱ्या कृतींचा मनोदेवतेपुढें पाढा वाचणेंच होय. परिस्थितीच्या म्हणजेच विकारांच्या आहारीं जाऊन आपलें जें कांहीं आचरण होत असेल त्याचा अलिप्तपणें विचार होतो दिनचर्या लिहून काढतांना. प्रवाहपतितत्व किंवा विकारवशता हीं त्या त्या वेळीं जरी उमगलीं नाहींत किंवा उमगून जरी आवरतां आलीं नाहींत तरी दिवसाकांठीं दिनचर्या लिहायच्या वेळीं तींमधील

वाजवीपणा किंवा गैरवाजवीपणा पारखण्याइतकी मती समतोल झालेली असते. आत्मनिरीक्षणाची ह्या निमित्तानें संधि साधली जाते, संवय लागते आणि अर्थातच कांहीं सुधारणा होण्याची शक्यता उद्भवते.

हे विचार मनांत कधींकधीं घोळूं लागतात आणि मग मीही दिनचर्या लिहायचा संकल्प करून लेखणी हातीं घेतों. कधीं कधीं असा गडबडीचा आणि कार्यव्यापृततेचा कालखण्ड येतो कीं तेव्हां तर दिनचर्या लिहून ठेवण्याचीच जरूरी वाटते. अनेक कार्यक्रमांतून मानानें मिरवायचें, अनेकांना भेटी द्यायच्या, अनेकांकडून सत्कार घ्यायचे – वा:, असला कालखण्ड नमूद करायचा नाहीं म्हणजे काय ? अर्थात् असल्या दिवसांत दिनचर्या लिहायला प्रवृत्त होण्यांत एक प्रकारची आत्मपूजाच आहे. द्रव्यलोभ्याला एकान्तांत आपली पुंजी मोजतांना जसा आनन्द होत असेल तसाच आनन्द उत्सवप्रिय मनुष्याला आत्मगौरवाची नोंद करून ठेवतांना होत असला पाहिजे. एरव्हीं, मान–सन्मानांच्या मुसळधार पावसांत नेहमींच न्हाऊन निघत आलेला सम्पादक, दरएक दौऱ्यांत गल्लोगल्लीं होणाऱ्या आपल्या सत्कार-समारंभांचीं (खास वार्ताहराकडून आलेलीं) वर्णनें आपल्याच नियतकालिकांत, औचित्याचे विचार बाजूला सारून, आघळपघळपणानें देता ना ! असली दिनक्रमणा लिहिण्याची अनावर इच्छा होणें म्हणजे आत्मस्तुति करून घेण्याच्या लालसेचें तर्पण करणें होय.

कांहीं अभिमानास्पद घडलें कीं आपल्या संगतींतील जिव्हाळ्याच्या माणसांना आपण नाहीं कां तें कौतुकानें सांगत ? आत्मस्तुतीची थोडीशीही हौस नसणारा मनुष्य विरळा; आणि ती जिवाभावाच्या स्वकीयांजवळही भागवून न घेणारा अगदींच मुक्त ! विरळ आणि मुक्त ह्या कोटींतला मीही पण नाहीं. पण प्रिय माणसें सदोदितच बरोबर असणार कशीं ? विशेषत: फिरतीवर असलों म्हणजे एकटेपणाच येतो माझ्या वाटणीला. तसल्या एकलकोंडेपणांत दिनचर्या लिहिण्याची माझी प्रवृत्ति स्वाभाविकच विशेष बळावते. ऐतिहासिक महत्व नव्हे, आत्मशुद्धि नव्हे; केवळ आत्मप्रौढी, हेंच माझ्या दिनचर्यलेखनाचें स्फूर्तिस्थान होय, असें कोणी ह्यावरून म्हणाला तर ?

‘ एकाद्याची दिनचर्या मला दाखवा, म्हणजे तो मनुष्य कसा आहे तें

मी सांगेन', असें एक प्रसिद्ध गृहस्थ कुठेसें म्हणाल्याचें आठवतें. सत्यच आहेत त्याचे हे उद्‌गार. पण प्रांजळपणानें दिनचर्या लिहिलेली असली तरच त्या गृहस्थाची अगदीं गाभ्यासहित ओळख पटायची ! माझीच गम्मत पाहा ना ! सध्यांच्या दिवसांतील माझ्या महत्वाच्या गोष्टी मी दिनचर्येंत लिहित आहे. कुठें कुठें कोण–कोणत्या भूमिकेंत मी कसा कसा मिरवलों ह्यासंबंधीं लिहिलेली ही दिनचर्या अगदींच ठोकळ मानाची असून, आत्मप्रौढीपासून हात कसोशीनें आखडता घेतला आहे मी. ऐतिहासिक दृष्ट्या ह्या नोंदीचा उपयोग होईल आणि मला लोक फारच चाहत होते असें ह्या नोंदीवरून कोणी अनुमानही काढील. पण माझें स्वभाव–निदर्शन किंवा व्यक्तिमत्व ह्याबाबत काय ज्ञान देतील ह्या नोंदी ? तशा जिज्ञासेनें प्रेरित झालेला, मानवी स्वभावाचा एकादा अभ्यासू निरीक्षक जर माझ्या मागोमाग ह्या सर्व कार्यक्रमांतून हिंडला असेल तर त्याच्या टिपणीच अधिक मनोरंजक आणि महत्वाच्या ठरतील. आणि खुद्द मीच जर ती भूमिका घेतली तर माझें टांचण विशेषच गूढ स्वभावाचें पृथक्करण करून दाखवील– पापुद्रे उकलून दाखवील. अनुमान आणि यथातथ्य निवेदन ह्यापैकीं दुसरेंच जास्त विश्वसनीय होय. आणि सारें कांहीं यथातथ्य जी सांगेल तीच खरी दिनचर्या !

कालच्या सभेंत माझ्या वाग्गंगेचा स्रोत वाहूं लागला असतांना, मजपासून थोड्याच अंतरावर कांहीं मुलीं आपआपसांत कुजबुजत होत्या. सगळ्याजणी एकाच वयाच्या आणि एकाच वर्गांतील मैत्रिणी असाव्यात असं कोणीहि म्हणाला असतां. त्याचप्रमाणें त्यांची हासरी वृत्ति आणि चलाख मति वेलीवरच्या ताज्या फुलांप्रमाणें खुलून दिसत होती. त्यांच्या हालचाली, हौस आणि बालस्वभावोचित कौतुक यांनीं नटलेल्या होत्या. अर्थात् ह्या त्यांच्या सगळ्या स्वरूप–साजाशी कुजबुज सुसंगतच होती. पण सर्व तटस्थ श्रोतृ–समाजांत ती त्यांची हालचाल व कुजबुज, एकाद्या विशाल व प्रशांत जलाशयांत कुठें तरी मासळ्यांनीं चलबिचल उठवावी त्याप्रमाणें दिसत होती. सहजच, माझें वारंवार तिकडे लक्ष जाई आणि तन्मयता भंग पावे. वक्ता आणि श्रोतृवर्ग ह्यांच्यांत प्रस्थापित होत असलेली एकतानता वरचेवर बिघडविण्यास आपण कारण होत आहोंत हें त्यांच्या लक्षांत [ येऊं

नये इतक्या त्या अज्ञान नव्हत्या, पण ] येत नसलें तरी वक्त्याला सहन कसें व्हावें ? माझ्या सहनशीलतेला अखेर ढळ पोंहोचला आणि त्यांना मी त्यांच्या गैरशिस्त वर्तनाबद्दल बोललों. तजेल डोळे, तरतरीत नाक, उंच मान आणि ती वळविण्याची चित्तवेधक लकब, अशा वैशिष्टचांनीं त्यांतली एक मुलगी विशेष उठून दिसत होती; आणि त्या वाक्ताडनाच्या वेळीं मी तिच्याकडेच मुख्यत: नजर लावली होती. "तुम्ही समंजस व सुशिक्षित दिसता. चालू कार्यक्रमाशीं तुम्ही तद्रूप होऊं नये याचें मला नवल वाटतें. तुम्हांला तरी हें शोभत नाही" असें माफक आवाजांत पण करकरीतपणें मी बोललों. व्हायचा तो परिणाम झाला. सगळचाच मैत्रिणी खजील झाल्या, त्या बाल अभिनेत्रीनें तर एकदम गंभीरपणा धारण केला, आणि खजिलपणांतून तो उद्‌भवलेला असल्यामुळें त्यांत मला करुणास्पदता दिसून आली.

कार्यक्रम व्यवस्थित आणि प्रशस्तींत पार पडला. पण मला मात्र रुखरुख लागून राहिली. त्या डौलदार फुलाला आपण उगीचच दुखवलं !

दुसऱ्या दिवशीं फिरून तशाच प्रकारें दुसरें एक सभास्थान भूषविण्याचा मला योग आला. पण त्या श्रोतृसमुदायाला माझ्यापेक्षां, त्या फुलानें -- आदल्या दिवशीं मी ज्या फुलाला दुखवलें होतें त्या फुलानेंच -- भूषविलें होतें. शिवाय ती दुखापत अजूनही दिसून येत होती त्या चर्येवर ! मग कालच्या प्रकाराची पुनरावृत्ति आज कशाला करावी लागणार ? नेहमींच मी श्रोत्यांची जिज्ञासा मधुनमधुन चांचपतों. त्याचप्रमाणें आजही केलें. तोंच तिनें आपली जिज्ञासा तत्परतेनें व्यक्त केली. मला आश्चर्य वाटलें; काल निष्ठुरपणा दाखवला त्याची अधिकच खंत वाटली. आणि विशेष आश्चर्य असें कीं इतर कुणाच्याही जिज्ञासा-प्रश्नाकडे लक्ष न देतां मी केवळ तिचीच अपेक्षा अगत्यानें पूर्ण केली !

समारंभ संपला आणि माझ्या गळचांत हार घालण्यांत आला. भुर्कन पांखरें उडून जावींत त्याप्रमाणें श्रोते भराभर पांगले आणि निमंत्रकाच्या मागोमाग मी ही चालूं लागलों. पण माझी नजर मात्र त्या पांगलेल्या श्रोत्यांतून त्या बालिकेला धुंडण्यांत गुंतून गेली. अल्पावधींतच ती दृष्टीस पडली आणि, कांहींशी वाकडी वाट करून, मी माझ्या हातांतील हार तिला

देतांना म्हणालों, " तुम्ही ह्याचा अधिक चांगला उपयोग करूं शकाल."

माझ्या ह्या कृतीचा आंवती – भंवतीच्या लोकांनीं काय अर्थ केला असेल ? सरळ स्वभावाची मंडळी म्हणाली असतील " जिज्ञासूवर हा अनुग्रह दिसतोय; प्रसाद दिला." " ह्यांच्या परिचितांपैकीं ही बालिका असेल " असा कोणी तर्क-केला असेल, तर कितीकांच्या डोळ्यांत मिष्किलपणाची लकेरही चमकली असेल. पण मी जर यथातथ्य दिनचर्या लिहिली असती तर मला नमूद करून ठेवायला पाहिजे होतें की –

माझा निष्ठुरपणा धुवून काढण्याचा मी अशा रीतीनें प्रयत्न केला; अनुग्रह नाहीं केला ! झालेल्या आगळिकीची क्षमा याचिली; परिचयाचं प्रदर्शन नाहीं केल ! जें दुःख दिलं त्याबद्दल प्रायश्चित्त घेतलं. मिष्कील-पणाचा वास – छे, माझी ती वृत्तीच नव्हे. सामाजिक जबाबदारीची ज्याला जाणीव आहे तो पथ्य फार कडकपणानें पाळतो. शिवाय, जिज्ञासा व्यक्त करून, ' मनांत अढी धरली नाहीं ' हें जिनें दाखवलं तिच्यापुढें, बालिश-पणातील असल्या सरलतेपुढें, थोरवीपुढें मिष्कीलपणा ? छे, कुटिलांनाही तो साधणार नाहीं; पार विरघळूनच जातील ते ! — आदल्या दिवशी चुकून पायमल्ली घडली तिची भरपाई करण्यासाठीं मी ती पूजा केली !

असलें पृथक्करण जोपर्यंत दिनचर्येंत लिहिलें जात नाहीं तोंपर्यंत त्या दिनचर्येच्या लेखनांत मामुलीपणाच असणार; नाहीं कां ? काय ओळखण होणार त्या मनुष्याची त्यावरून ?

ललित–लेखकानें अशी दिनचर्या लिहिलेली नसली तरी फारसें आडणार नाहीं. त्याची आन्तरिक ओळख त्याचें वाङ्मय धुण्डाळूनही होईल. वाङ्मयांतही त्यानें हातचलाखी केलेली असते, कलेचें आवरण घेतलेलें असतें. पण कलावन्ताची कारागिरी व कारागिरीमागचें मानसशास्त्र तुम्हांला नीट माहीत असेल तर तुम्ही कलाकृतीच्या गाभ्याला हात घालूं शकाल आणि कलावन्ताच्या अन्तरंगांत प्रवेश मिळवूं शकाल. वरील गोष्ट मी तरी दैनंदिनींत कुठें लिहून ठेवली आहे ? पण तिचा अपुरेपणा सिद्ध करण्याच्या उद्देशानें लेखणी उचलली अन् समर्थनार्थ ओघांत ती लिहून गेलों !

---

**माझा** मित्र बाबासाहेब – एक बडा पगारदार गृहस्थ. त्याच्या दिवाणखान्यांतील सरंजाम अर्थातच त्याच्या दर्जाचा, ऐपतीचा आणि अभिरुचीचा असणार. मध्यभागीं एक गोलमेज त्यावर रेशमी भरत-कामाचा तापता अंथरलेला; आणि त्यावर कुंडीसारखी प्रशस्त पितळी फुलदाणी रोज सकाळीं ताज्या फुलांनीं भरगच्च भरलेली. मेजाभोंवतीं दोन कोच आणि गाद्या-गिरद्यांनीं युक्त अशा चार खुर्च्या, असा एकजात संच. बाजूच्या एका कोपऱ्यांत एक छोटेंसें चौकोनी मेज. त्या मेजावर चार-दोन ताजीं नियतकालिकें, सिगरेटची डबी व रक्षापात्र. पण ह्या जंगम वस्तू नेमक्या ह्याच जागीं निरंतर आढळतील असें मात्र नाहीं. आल्या-गेल्या भोक्त्यांच्या चाळवा-चाळवीमुळें कधीं मधल्या मेजावरही त्यांचा मुक्काम पडलेला असतो.

बाबासाहेबांच्या बैठकीच्या खोलींतल्या ह्या मांडामांडींत मुख्यत: त्यांची आवड प्रतिबिंबित झालेली असणारच. कारण, ऐषआरामाच्या लाडक्या कल्पना प्रत्येकजण आपल्या उराशीं बाळगून असतो आणि यथाशक्ति त्या वास्तवतेंत उतरवूं पाहतो. आपल्या त्या आवडी-निवडींत आपल्याकडे येणाऱ्या संबंधी जनांची सहजासहजी आरामशीर सोय शक्य तितकी पाहण्याकडेही आपली नजर असते. पण खास स्वत:ची अशी बाबासाहेबांची ह्यापैकीं कोणती खुर्ची असेल आणि त्या खुर्चीवर बसण्याचें खास सुख बाळासाहेबांना कितीसें उपभोगतां येत असेल ? असा माझ्या मनांत वरचेवर प्रश्न डोकावत असतो. कारण, मी जेव्हां जेव्हां त्यांच्याकडे गेलों आहे, तेव्हां तेव्हां ते त्या दिवाणखान्यांत बसलेले आढळले, असें आठवत नाहीं. एकाद्या खुर्चीवर अभ्यागतानें प्रथम विराजमान व्हावें आणि मग त्यांनीं घरांतून तिथें प्रविष्ट व्हावें, हा नेहमींचा प्रकार. [ दिवाणखान्यालगतच्या छोटया खोलींत ते कामकाजासाठीं बसत ]. म्हणजे, असेंच नाहीं कां कीं मित्रमंडळीबरोबर गप्पागोष्टी करण्यासाठीं तो दिवाणखाना आणि त्यांतली ती सजावट. आणि त्यांतहीं, स्वतांची अशी खास खुर्ची असली तरी ती

स्वतांसाठीं रिकामी सांपडेलच ह्याचा काय नेम ?

पण बाबासाहेबांच्या पर्यंत तरी जायला कशाला पाहिजे ? माझीच गोष्ट घ्या कीं–

पेशवाई बैठक, ही माझी अभिरुचि. खोलीभर जाजम घातलेलें आहे; एका हवाशीर उजेडाच्या बाजूला [पण रहदारीच्या नजरेचा मारा चुकवून] गादी पसरलेली आहे; तीवर पांढराशूभ्र सरपोस आणि पाठीशी भव्य लोड; आजूबाजूंना चार–दोन तक्के. पानदान आणि शामदान ह्यांच्याशिवाय असल्या बैठकीला शोभा नाहीं. चालू काळाला अनुसरून शामदानांत बिजलीबत्ती घेतली तरी चालेल. ही माझ्या शौकीन आवडीची मर्यादा. ह्या खोलींत बसून तुकोबाच्या भक्तिभावानें पुनीत व्हावें नि समर्थांच्या प्रयत्नवादाची कास धरावी; किंवा अशा इतमामांत लोळत पडल्या पडल्या, एका कुशीला वळून Stefan Zweig (स्टीफान झ्वाइग्), Ethel Mannin ( इथेल मॅनिन ), Esa Dora Duncan ( इसा डोरा डंकन ) ह्या वाचासुन्दरांचे (व सुन्दरींचे) अंतरंग; आणि दुसऱ्या कुशीला वळून Joad ( जोड ), E. V. Lucas, A. A. Milne अशा निर्भेळ वा ललित तत्वज्ञांचें मनोगत जाणून घ्यावें. त्यांतल्या त्यांत Richard King ( रिचर्ड किंग ) हा लघुनिबंधकार तर आपल्या–सारख्या सामान्यांच्या बैठकींत छान समरस होणारा. त्याचीं पुस्तकें वाचणें म्हणजे समानधर्मा स्नेही भेटल्यावर त्याच्याशीं हितगुज करण्यासारखेंच आहे.

पण ही मिजास कितींदां माझ्या वाट्याला आली असेल अशी तुमची कल्पना आहे ? माझी ही आवडती कल्पना स्वप्नसुखासारखीच क्षणभंगुर आणि दुर्लभ ठरली आहे. हे माझे ग्रंथकार– हे माझे दोस्त मजकडे येणाऱ्या मित्रांबरोबर कधींच निघून गेले आहेत. कारण, मित्रांचीं मनें मोडून मला कोणतें ऐश्वर्य उपभोगतां येईल ? आणि बैठक– ती देखील स्वतांच्या उप-भोगाकरितां नसतेच मुळीं, असें माझ्या अनुभवास आलें आहे. माझ्या त्या आवडत्या गादीवर मी कधीं तुम्हांला दिसलों आहे कां ? " राखावीं बहुतांचीं अंतरें " म्हणून जशीं पुस्तकें पायरवलीं आहेत तशी, येणारांचा मान राखावा म्हणून, गादीही माझ्या खालून गेली आहे. तुम्हाला आठवत सुद्धां असेल,

तुम्ही एकदां मला विचारलेंत —

" कां हो, जेव्हां पाहावं तेव्हां तुम्ही आपले बाजूला बसलेले ! – गादीवर कां बसत नाहीं ? "

त्यावर काकूच आंतून म्हणत आल्या—

" ह्यांचं असंच आहे. ह्यांची ही आवडती बैठक; पण हे बसतील काय म्हणता ? नुसती आरास आहे बघा ! मी सांगते ना, ह्यांची ही बैठक कि नाहीं लोकांच्यासाठीं आहे ! "

हिचें हें म्हणणें, – काय खोटें आहे ?

आणि जीवितविषयक तत्वज्ञानाच्या बैठकींत तर हा न्याय ठळकपणें प्रत्ययास येतो. प्रपंचाला जशी ह्या बैठकीची जोड तशी जीविताला तत्वज्ञानाच्या बैठकीची जोड देण्याची योजना जो तो आपल्या कुवतीप्रमाणें—कल्पनेप्रमाणें—करीतच असतो. तिचा प्रत्यक्ष वापर कितपत होईल हा प्रश्न निराळा. व्यावहारिक गुन्तागुन्त आणि उपचार ह्यांमुळें तें तत्वज्ञान वळेलच असें नाहीं; पण तें तो आपल्यापुढें मांडून ठेवील. मग आंवती—भोंवतींच्या मंडळींनीं ' हें लोकांपुरतं बरं कां ' अशी परोक्षापरोक्ष कुत्सा केली तरी चालेल. कारण, ह्या बैठकीवर—आपल्याला जमत नसलें तरी—आल्यागेल्यांना तरी आरामशीर टेकतां यावें अशी त्याची प्रामाणिक भावना असते.

आणि मग प्रश्न येतो कीं, लोकांना ' ब्रह्मज्ञान ' सांगण्यांत ज्याची ही प्रामाणिक भावना असेल त्याला ' कोरडा पाषाण ' म्हणून हिणवण्यांत काय हांशील ? बाळमुखांतून बाहेर पडलेलें सुभाषित जर अग्राह्य नाहीं तर आचरतां न आलेलें ब्रह्मज्ञान लोकांना सांगणारा 'कोरडा पाषाण' असला म्हणून काय बिघडलं ? ध्येयाचें शिखर गांठणें पांगळ्याला शक्य झालें नाहीं तरी त्यानें त्यावर नजर लावून पायथ्याशीं बसून राहायला काय हरकत आहे ? इतकेंच नव्हे तर, पायथ्याशीं बसल्या–बसल्या वाटसरूंना आरोहणाची भर दिली – स्वतांच्या पाषाणतुल्य जिण्याची पायरी करून देऊन भर दिली– तर त्याचें अभिनंदनच केलें पाहिजे.

---

## मागणें, वरदान, आशीर्वाद– : १४

एका मित्राच्या – शामरावाच्या – लग्नाला मी गेलों होतों. तो मोठा दिलदार असल्यामुळें त्याचा मित्रपरिवारही मोठा होता. अर्थात्, मण्डप तर मित्रांनीं गजबजला होताच, पण अभिनंदनाचें टपालही बरेंच येत होतें. तार-वाला वरचेवर तारा आणून देत होता. वैदिक पद्धतीचा लग्नसमारंभ असल्यामुळें मांडवांत भिक्षुकांचें तंत्रयुक्त मंत्रपठण जोरजोरानें चालूं होतें.

शान्तिरस्तु । पुष्टिरस्तु । तुष्टिरस्तु । आरोग्यमस्तु
ऐश्वर्यमस्तु । धनधान्य समृद्धिरस्तु ।

पंजाबमेलच्या वेगानें घोष चालविला होता त्यांनीं ! शामरावाच्या कानांवर ते मंत्र आणि मस्तकांवर अभिषेकाचे थेंब पडत होते खरे; पण तो मात्र हातीं पडलेलें पत्र वाचण्यांत गढून गेला होता. मीही त्याच्या आंवतींभोंवतीं पाठीराख्याप्रमाणें गुटमळत असल्यामुळें, त्याच्या हातांतील पत्रावरून नजर टाकणें मला अशक्य नव्हतें शिवाय, तें पत्र पाठविणाऱ्या दोस्तावर आमचा समाईक हक्क असल्यामुळें, तें वाचण्यांत चोरटेपणाही नव्हता. "तुम्हां वधु-वरांना सुख, शान्ति, दीर्घायुष्य, ऐश्वर्य, पुत्रपौत्र, धनधान्य यांचा निरंतर लाभ होवो अशी माझी परमेश्वराजवळ प्रार्थना आहे," ह्या शुभ-चिंतनानें तें पत्र संपलें होतें. मला जरा गम्मत वाटली. भटजोंच्या तोंडून कानांवर पडणाऱ्या मंत्रांचा अर्थ लावण्याकडे लगिन – घाईत नवरदेवाचें अवधान जाणार नाहीं हें जाणूनच जणुं कांहीं त्या पत्रांतून तो त्याच्या नजरेसमोर त्याचवेळीं धरला जावा असा विधिसंकेत होता कीं काय ?

मंत्र काय किंवा तीं तसली पत्रें काय, आशीर्वादांचा अघळपघळपणा सगळीकडे सारखाच ! आशीर्वाद द्यायचे तर त्यांत कद्रूपणा कशाला ? घ्या, ऐश्वर्य घ्या, सुख घ्या, शान्ति घ्या, धनधान्य–समृद्धि घ्या, सगळं कांहीं घ्या ! बिघडतं काय यादी वाचायला ? तशांत मित्राचं शुभचिंतन ! तें करतांना औदार्य कां नको ? आशीर्वादाला किंमत पडत नाहीं म्हणून ते देतांना उदारपणा दाखवावा आणि मागणें मागतांना कदाचित 'अमुक एक मागायचं राहिलं' अशी पश्चात्ताप करण्याची पाळी येऊं नये म्हणून त्यांत

ऐसपैसपणा ठेवावा, अशीच बहुशा विचारसरणी असावी ह्या सर्वांच्या मुळाशीं.

आशीर्वाद देतांना किंवा परमेश्वराजवळ मागणें मागतांना शब्दांच्या मोजकेपणाकडे आपण किती तरी दुर्लक्ष करतों. इच्छेला तत्काळ फळें येण्याइतकें तप:सामर्थ्य आज कुणाजवळ नाहीं, कल्पवृक्षाची लागवड करायला बी–बियाणें कुणाला गवसलें नाहीं आणि आपण सर्व मानव जरी परमेश्वराचींच लेंकरें असलों तरी बोलला बोल खरा होण्याइतका परमेश्वरी सामर्थ्याचा वारसा आपणाकडे आला नाहीं, म्हणून तर हा सढळपणा नसेल ना ? बोल खरा होण्याचें सामर्थ्य जिव्हेंत नाहीं म्हणून तर 'अष्टपुत्रा सौभाग्यवती भव' हा आशीर्वाद आपण बेलाशक देऊन टाकतों पदोपदीं ! नाहीं तर, ह्या तीव्र जीवनकलहाच्या काळांत सूड उगवायलाच त्याचा उपयोग हितशत्रूंनीं केला असता ! आणि कोणा आप्तानें – वाचासिद्धि असलेल्या कोणा आप्तानें, रेशनिंगच्या ह्या दिवसांत गाफिलपणानें तो उच्चारला असता तर दिनयवति सौभाग्यवती देखील लाटणें घेऊन त्याच्या पाठीमागें लागली आहे, असें दृश्य दिसलें असतें. उलट, युद्धधुंद हुकुमशहांनीं आपल्या राष्ट्रांतील यच्चयावत महिलांना 'शतपुत्रा सौभाग्यवती भव' असा सुधारून वाढवलेला आशीर्वाद द्यायला ह्या आर्यावर्तांतून युद्धसाहित्य म्हणून ब्रह्मवृंदांचीं पथकेंच्या पथकें पळवून नेलीं असतीं !

टेलीफोन वापरणारांना Be Brief अशी एक ठळक सूचना असते. ती सर्वत्र आमलांत आणायची झाल्यास, हे आशीर्वाद आणि हें देवाजवळचें मागणें ह्यांना किती सुटसुटीत रूप येईल ! आणि खरोखरी तसें तें यायला काय हरकत आहे ? आपण जें मागणें मागतों त्याचा अर्थ काय, त्याची व्याप्ती किती, त्यांत कोणत्या बाबींचा समावेश होतो किंवा कोणत्या वगळल्या जातात ह्याचा आपण नक्की विचार करीत नाहीं; म्हणूनच शब्दांची उतरंड उगीच रचत जातों.

शामरावाला आलेल्या त्या पत्रांतील आशीर्वादाचे किंवा भटजींच्या मंत्राचेंच उदाहरण घ्या ना ! 'ऐश्वर्यमस्तु' म्हटल्यावर 'धनधान्य समृद्धिरस्तु' म्हणण्याची गरज काय ? ऐश्वर्य म्हणजे पैका–अडका, सोनें–चांदी,

हिरे–मोती – एवढाच देवांच्या शब्दकोशांत कांटेतोल अर्थ असला तर? भात–भाकरी कुठून मिळणार? आणि दुधा–तुपाची काय सोय? तेव्हां, धन ( म्हणजे गोधन ) आणि धान्य हेंही निराळें मागून ठेवावें असाच त्या मंत्र बांधणारांनीं विचार केलेला असावा!

तसेंच, त्या दूरस्थ मित्रानें पत्रांत 'ऐश्वर्य लाभो' एवढेंच नुसतें म्हटलें असतें तर भागलें असतें काय? ऐश्वर्यानें आपण काय मागतों? ऐश्वर्य शेजाऱ्या – पाजाऱ्यांच्या डोळ्यांत खुपतें आणि त्याच्या जपणुकीसाठीं जिवाचें रान करावें लागतें. Money makes the mare go; whether she has legs or no आणि 'दाम करी काम' हीं शालेय जगांत पाठ केलेलीं सुभाषितें सर्वस्वीं खरीं नसून पैशानें सर्व कांहीं मिळवितां येतें असें नाहीं. मी बाळगुन्हेगारांच्या बंदीशाळेमध्यें नोकरीस होतो त्यावेळची एक आठवण. त्या बंदीशाळेच्या साहेबाजवळ इतमामानुसार मोटर होती; पण खात्यांतल्या त्यांच्या वरिष्ठानें मात्र ( धूर्तपणानें ) ती बाळगली नव्हती. बंदीशाळेला भेट द्यायची त्या वरिष्ठाला जेव्हां जेव्हां लहर येई किंवा गरज पडे तेव्हां तेव्हां तो टेलीफोनवरून आमच्या साहेबा–कडेच मोटारची मागणी करी. अशाच एका प्रसंगीं शोफरला मोटार घेऊन जायला सांगतांना, साहेबांनीं मला विचारलें 'यशवन्तराव, तुम्ही काय मागणें मागाल देवाजवळ? सत्ता कीं श्रीमंती?' पण माझ्या उत्तराची त्यांना अपेक्षा कुठें होती? तेच लगेच बोलून गेले "मी मागेन, देवा, मला सत्ता दे!" मुकाट्यानें मोटर द्यावी लागत आहे ह्या जळफळाटांतून त्यांच्या ह्या मागण्याचा उगम असला तरी त्यांत खोटें काय आहे? सत्ते-पुढें शहाणपण चालत नाहीं आणि प्रसंगीं श्रीमंतीलाही मान खालीं घालावी लागते.

शिवाय, बाजारीं किंवा राजदरबारीं दाम काम करूं शकला तरी, प्रेमाच्या मुलखांतही त्याची फत्ते होईल, असें म्हणतां यायचें नाहीं.

ऐश्वर्याचा पराभव म्हणून डायमंड जिम [Diamond Gim] च्या चरित्राकडे बोट दाखवतां येईल. हिरेमाणकांची त्यानें मुक्त हस्तानें खैरात केली. शहराच्या चारी दिशांना टोलेजंग हॉटेलांत मोठमोठ्या मेजवान्या

देण्यांची त्यानें वारंवार दंगल उडविली. स्वत: मदिरेच्या थेंबालाही शिवला नाहीं. परंतु त्याच्या दागदागिन्यांच्या लखलखाटानें एकही मदिराक्षी दिपून त्याच्या गळयांत पडली नाहीं. एका स्वरूपसुन्दर अभिनेत्रीवर त्याचा जीव जडला होता. तिला त्यानें प्रेमभेट म्हणून सोन्यानें मढविलेली व पांच-हिरे-माणकांनीं सजविलेली सायकल बक्षिस दिली. त्या सायकली-वरून ती त्याची मनोभिरामा जाऊं लागली कीं डोळयांचें पारणें फेडण्या-साठीं रस्त्यांत ठायीं ठायीं थबकणारे लोक इतके बेभान होत असत कीं त्यामुळें कधीं कधी अपघातही होत. पण ती सायकल-सुन्दरी वश होण्याचा 'गोड अपघात' मात्र डायमंड जिमच्या नशिबीं नव्हता. बिचाऱ्याला रत्नाच्या राशींत लोळूनही हयातभर ब्रह्मचारी राहावें लागलें. आपल्याला बायको नाहीं, म्हणून लहान मुलासारखा रडतही असे तो ! "दाम करी काम" ह्या सुभाषिताला एवढा बट्टा कधी लागला नसेल !

शिवाय, अगणित ऐश्वर्य मिळूनही तृप्ति होईल ह्याचा काय नेम ? जगज्जेता अलेक्झांडर शेवटीं, जिंकायला पृथ्वी उरली नाहीं म्हणून उदास झाला; तर जगाचा निरोप घेण्याचा समय जवळ येऊन ठेपल्याची जाणीव झाल्यावर महंमूद गझनवी आपल्या भाण्डारांतील अगणित संपत्तिकडे पाहून वियोगविव्हल होत्साता ढसढसा रडला ! ऐश्वर्य मिळत गेल्यानें त्याच्या हव्यासाला जर सीमा रहात नाहीं आणि ऐश्वर्य लयास गेलें कीं, 'घट तीन धनांनीं भरले' म्हणून तिकाटण्यांत अमिस्तपणानें ऊर बडवण्यांत जर पर्यवसान होतें, तर 'ऐश्वर्य लाभो' असा आशीर्वाद द्यायला हितैषी धजावेल कां ?

तोच प्रकार सुखाचा. सुखाची व्याख्या करण्यापासूनच पंचाईत ! सुख सापेक्ष आहे आणि तें मानण्यावरच आहे ! असमाधानी माणसाला तें कधींच लाभावयाचें नाहीं. पोटांत पोटशूळ उठल्यावर पंच पक्वान्नांची काय चव ? गळा ( भयानें, शंकेनें किंवा व्याधीनें ) धरला नसेल तरच घांस घशाखालीं उतरायचा !

*अशा स्थितींत, परमेश्वराजवळ थोडक्यांत पुष्कळ काय मागणें मागावें? सुटसुटीत उत्तर सांपडणें कठिणच !*

मांडवांत चाललेल्या वैदिक विधींत मध्यें थोडासा विश्रांतीचा समय

आला. इतक्यांत, रस्त्यांतून जाणाऱ्या एका स्वकीयाकडे – पंतरावाकडे – शामरावाची नजर गेली. पंतरावाची चिमुकली भाची अतिशय आजारी होती. तिचा समाचार विचारावा आणि संध्याकाळच्या पान-सुपारीच्या आमंत्रणाची आठवण द्यावी म्हणून त्यांना हांक मारण्यांत आली. बिचारा आंत आला. त्याचा चेहरा अगदीं उतरलेला होता. येतांच, त्यानें लोडाशीं अंग लोटून दिलें. आजाऱ्याची सेवा-शुश्रुषा आणि औषधोपचार करून ताटकळलेला देह आणि कष्टी झालेला जीव विसाव्याला आसावलेलाच होता जणूं !

शामराव सहानुभूतीनें मला सांगूं लागला, " बिचाऱ्याच्या पाठीमागें काय एक एक त्रास आहे म्हणता ! आज तीन आठवडे झाले, सारख्या खस्ता खातोय भाचीच्या ! प्रत्येक बदलतें लक्षण डॉक्टरांच्या नजरेला आणून देण्यांत चालढकल नाहीं, कीं डॉक्टराच्या तोंडून निघालेलें औषध आणून सुरू करण्यांत किंचितही कसूर नाही ! इतकं केल्यासारखं देवानं यश द्यावं म्हणजे झालं ! "

पंतरावाला राहवलें नाहीं. भारावलेल्या मनानें आणि भरून आलेल्या गळ्यानें तो बोलूं लागला, " शामराव, प्रयत्न करणें मनुजा हातीं ! यश देणें परमेश्वराच्या हातीं. वहिनीच्या आजाराशीं मी अशीच टक्कर दिली आहे. त्यावेळीं मला आमच्या डॉक्टरांच्या पत्नी म्हणत ' पंत, तुम्ही म्हणूनच तिला शर्थीनं वाचवलीत ! 'इकडं' अगदीं धन्वंतरी असायचं झालं तरी, वेळच्यावेळीं आणि म्हणतील तें औषध-पाणी करण्यांत तुमच्याकडून अंतर झालं असतं तर हे तरी काय करणार होते ? ' तसंच ह्या भाचीच्याही दुखण्यांत यश यावं; दैवानं दगा देऊं नये ! म्हणजे झालं ! पण एक सांगतो, दैवाची योजना कांहींही असली तरी माझं देवाजवळ मागणं आहे तें एवढंच कीं माझ्याकडून कांहीं उणं पडूं नये ! आजाऱ्याच्या जिवाचे क्लेश माझ्या दीनदुबळेपणानें वाढले, असं होऊं नये. माझ्या जागीं एकादा कोट्याधीश असतां तरी त्यानं काय अधिक केलं असतं, असं मला दैवाला विचारायला आलं पाहिजे. आजाऱ्याच्या उपकरणांच्या बाबतींत चांदीचा पलंग, सोन्याचीं भांडीं, कलाबतूची मच्छरदाणी आणि गोरकाय सेविका वगैरे

ऐश्वर्य – प्रदर्शन तो करूं शकला असता; पण ऐश्वर्यांत आजाऱ्याला आराम पाडण्याचें सामर्थ्य नाहीं ना ? आराम पडायसाठीं जें जें हवें तें तें सारें मी आज करूं शकतों ना ?– अधिक कांहीं करतां येण्यासारखं नाहीं, असें खुद्द डॉक्टरच कबूल करतात ! बस्स ! ह्यांत मला मनःशान्ति आहे ! माझ्या-कडून कांहीं उणं नाहीं; उणं पडायचं असेल तर तें आतां दैवकृपेकडून ! ” इतकें बोलून, तुडंबलेलीं आंसवें मंडपांत पडायला नकोत ह्या भावनेनें तिथून चटकन् उठून पंतराव चालूं लागला !

पंतरावाचं एक वाक्य अतीशय महत्वाचें आहे. संसारांत ‘ कांहीं कमी पडूं नये ’ ! गृहस्थानें देवाजवळ कांहीं मागणें मागायचें असेल तर हेंच. प्राप्त परिस्थितींत कच्च्या–बच्च्यासाठीं अमुक एक हवें आहे पण तें नाहीं म्हणून खंत करण्याची पाळी येऊं नये !

खंत करायची पाळी आली कीं मनःशान्ति ढळते !

मनाची शांति ढळूं नये, हेंच खरें सुख !

मनाची शान्ति ढळूं नये, हेंच उदण्ड ऐश्वर्य !

भटजीच्या मंत्रघोषांतील ‘ शान्तिरस्तु ’ हाच एक खराखुरा आशीर्वाद. बाकीचे आशीर्वाद म्हणजे वायफळ तपशील किंवा यजमानांना खुष राखण्या-साठीं लावलेला व्यावहारिक पाल्हाळ ! त्या यादींतील ‘ शांतिरस्तु ’ एवढा आशीर्वाद गाळला तर बाकीच्याला फोलपटापेक्षां किंमत नाहीं आणि एक ‘ शान्तिरस्तु ’ एवढा आशीर्वाद सफळ झाला तर बाकीच्यांची पर्वा नाहीं. कामधेनूचे चारी अंचळ पिळायलाच पाहिजेत, असें नाहीं ! पण पुत्र-पौत्र, धन–धान्य हे सारें ऐहिक ऐश्वर्य लाभूनही, जर शान्तीला पारखें होण्याचा प्रसंग आला तर त्या ऐश्वर्याला काडीच लावायला नको काय ? आणि अठरा विश्वे दारिद्र्यांत, टाचा घासून प्राण सोडण्यासारख्या परिस्थितींतही, अन्तःकरणांतील शांतीचा सुधाकर आणि चेहऱ्यावरील त्याचें चांदणें, ह्यांची अम्लानता अचल राहिली तर त्या शांतिशीलापुढें नवकोट नारायणांनीं देखील स्वतांला करंटे समजायला हवें !

पण इतका विवेक थांदरटांना कसा जमणार ?

कौतुक वाटतें रामदासांचें ! अगदींच मोजक्या शब्दांचा उपयोग करून,

त्यानीं असल्या धांदरटांसाठीं देवांजवळ मागणें मागितलें आहे. तुकाराम, एव्हढा संतशिरोमणि ! पण त्यांनें सुद्धां, 'लई नाहीं' असें जें मागणें मागितलें तें प्रापंचिकाच्या भूमिकेवरून—

पोळी ताजी अथवा शिळी । देवा ! देइ भुकेच्या वेळीं ।
वस्त्र नवं अथवा जुनं । देवा ! देई अंग भरुन ।

पण थोडक्यांत पुष्कळ आणि ( मुमुक्षूच्या किंवा प्रापंचिकाच्या ) कुणाच्याही तोंडीं शोभण्यासारखें मागणें रामदासांचें आहे. तें म्हणजे—

' कल्याण मागणें रामा तुज ' !

ह्यापरतें, मला वाटतें, कांहींच मागण्याची जरूरी नाहीं. ' वरहि वरायासि पाहिजे समज.' आपण तर अज्ञानी. भविष्याच्या उदरीं काय आहे तें उमगत नाही. आपल्या विशिष्ट मागण्याचा अर्थ काय होतो आणि त्याच्या पोटांतून काय काय अनर्थ उद्भवतील ह्याची कल्पनाही करतां येणें शक्य नाहीं. अशा परिस्थितीत बिनधोकपणानें ' कल्याण करी रामराया ' असें मागणेंच श्रेयस्कर नाही कां ?

---

## रामदास आणि तुकाराम यांच्यांतील तफावत—

" ह्या दोघां संतांतील तफावत सांगायची तर एक ग्रंथच होईल, थोडक्यांत नाहीं सांगतां येणार " एक समव्यवसायी म्हणाले.

" थोडक्यांत असं कीं तुकारामाचं आराध्यदैवत विठ्ठल – कंबरेवर हात ठेऊन विटेवर उभा असलेला; तर रामदासाचं दैवत राम कोदंडधारी " आणखी एक अभ्यासू म्हणाला.

" रामदासाच्या अभंगाचा अनुवाद नको; तुमच्या दृष्टीनं सांगा " प्रश्न माझ्यावर आला. मी म्हणालों—

" तुकारामबोवांच्या हातांत चिपळ्या आणि गळ्यांत तंबोरा; तर त्या छाटी – लंगोटीवाल्याच्या हातांत कुबडी – पोकळ नव्हे, गुप्तीसारखी. ही जो उपकरणांत तीच नेमकी तत्वज्ञानांतही तफावत आहे दोघांच्या. "

---

# घांटीचा मण्डप- :१५

**पायऱ्या** चढून घांटीच्या मंडपांत गेलों. बिनखांबी तो मंडप म्हणजे सभोंवार क्षितिजावर टेकलेल्या अंतरिक्षाची प्रतिकृतीच जणु. नुसती पोकळी. मधोमध काय ती एक लोंबती घंटा. हात अचुक वर झाला ती वाजवायला.

आमच्या गांवचं राममंदिर. राममंदिरामुळेंच आमच्या गांवाला गांवपण आलें आहे.

शुचिपण दिलें तीर्थां गंगादिकासहि साधुंनीं।

–" वहें येथील मारुती, पालीचा खंडोबा, चाफळचा राम "–

राममंदिरापासूनच आमच्या गांवाला भूगोलांत स्थान मिळालें आहे. रामदासस्वामींनीं ह्या राममूर्तीची इथें स्थापना केली. राममंदिरापासूनच आमच्या गांवचा इतिहास सुरूं झाला.

समर्थांनीं बांधलेलं हें देऊळ, हा गाभारा, ही चौखांबी – म्हणजे 'चार खांबा चोवीस कमाना' असलेला छोटा मंडप. वास्तुशास्त्रांत एक अजब चमत्कार करून दाखविल्याच्या अहंभावानं ही नोंद करून ठेवली आहे रामदासांनीं, स्वदस्तुरची. त्याच्या पुढचा हा घांटीचा मंडप. घांट टांगली म्हणून जसा हा घांटीचा मंडप, तसाच, त्याचें घुमटाकृति छत आणि मधोमध लोंबणारी घंटा, हा सर्व बनावच मुळीं प्रत्यक्ष भव्य घांटेसारखा दिसतो म्हणूनही हा घांटीचा मंडप. रामदास स्वामींच्या पुण्याईनं उभं राहिलेलं देऊळ, देवळांत उभा असलेला कोदंडधारी राम आणि हा प्रचंड घंटेसारखा भासणारा घांटीचा मंडप.

मंडपांत पाऊल टाकतांच घांट वाजवायला माझा हात वर गेला. बरोबरच्या कला–कुमारांनीं हात वर केले. 'नाना, मी घंटा वाजवणार, मला उचला' सगळ्या बालगोपाळांनीं एकच गिल्ला केला. एकेकाला आळीपाळीनं मी उचललं. घंटा वाजवायची त्यांची हौस मी पूर्ण केली.

मलाही लहानपणीं बखोट्यांत हात घालून, असंच कोणी तरी वर

उचललं असेल; माझी हौस, घंटा वाजवायची माझी बाळहौस पुरी केली असेल. मीही घंटा वाजविली.

कुणी कुणी ही घंटा वाजविली असेल? रामदास स्वामींनीं वाजविली असेलच. घंटीचा इतिहासही तेव्हां पासूनच सुरू झाला. घंटी वाजवून ते गर्जले असतील, "सदा सर्वदा योग तूझा घडावा। तुझे कारणीं देह माझा पडावा." जय जय रघुवीर समर्थ.

कला, कुमार, तुम्हाला वाजवायचीय घंटा? पाहा वाजवून – ऐका, ह्या घंटानादांतून अजून ऐकूं येईल तुम्हाला 'तुझे कारणीं देह माझा पडावा.'

उद्धव स्वामींनीं वाजविली असेल ही घंटा. रंगनाथ स्वामींनीं वाजविली असेल, कल्याण स्वामींनीं वाजविली असेल – कल्याण करी रामराया!

कोणता राम?

जानकी-जीवन राम. जानकी-जीवन राम? छे, एक का, लक्षावधी भूमिकन्यकांनीं आपल्या जीवनाची त्याच्यावरून कुरवंडी करून टाकली असेल.

पतितपावन राम? दलितांचा उद्धार झाला असेलच असेल. तेव्हां तें बिरुद काय, आपोआपच चिकटेल!

कोणता राम?

"खळें गांजिल्या ..................

.............. राम कोदंडधारी!"

एकदां कोदंड धारण करून सज्ज झाल्यावर (धरणीला गांजणाऱ्या खळांच्या निर्दालनासाठीं ठाण मांडल्यावर) सगळीं स्तुतिस्तोत्रं, सगळीं बिरुदं आपोआप येऊन गळां पडतील.

राम कोदंडधारी! –इथं येऊन असा उभा राहिल्यापासून रामदास स्वामींनीं ही घंटा वाजविली असेल, कल्याण स्वामींनीं ह्या घंटेला हात घातला असेल, शिवाजी महाराज, मोरोपंत पिंगळे ह्यांनींही तेंच केलं असेल. स्वामींच्या सर्व कुळ्या ह्या घांटीच्या मंडपांत क्रमाक्रमानें, घोळक्यानें, अहमहमिकेनें जमा होऊन गेल्या असतील.

स्वामींची पाठराखणी करण्याकरितां आमच्या पूर्वजांची इथं नेमणूक झाली म्हणे. राघो शंकर, हणमंत रघुनाथ, गणेश हणमंत, दिनकर गणेश,

त्याचं बोट धरून नानू, बनू, विनू – सगळे ह्या घांटीच्या मंडपाखालून आले गेले, एकवर, एकवर.

कला कुमार माझ्या गुडघ्याशीं झोंबून मला म्हणतात 'नाना, मला उंच करा, मला, मला, –मी वाजवणार घंटा.'

घण घण घण घण

आपला तर हात पोंचतोंच आहे. आपणही वाजवूंया.

जय जय रघुवीर समर्थ.

कशासाठीं घंटा वाजवायची ?

आपण दर्शनाला आलों असल्याची देवाला वर्दी द्यायसाठीं.

कोणत्या देवाला ? दगडी मूर्तीला ? कां, सर्वसाक्षी जगन्नायकाला ? सांगा ना ? बरं, सोडून द्या हा प्रश्न.

राममंदिर म्हणजे शिस्तीचा भोक्ता असलेल्या बड्या अंमलदाराचा बंगला आहे कीं काय, दारावरची घंटा वाजवून वर्दी द्यायला ?

'कोण आहे ?' मारुतीनं आंतून विचारलं तर ?

मी आहे.

कोण म्हणालात ?

मी आहे मी.

रामदासस्वामी होय ?

दार उघड म्हणजे कळेल कोण आहे तें !

खरंच आहे; सांगायला कशाला पाहिजे ? तेव्हांच दिसेल ! काय दिसेल ? माझं मलाही कळतंय कीं कुठं रामदासस्वामी आणि कुठं मी ? त्यांनीं घंटा वाजविली, त्यांच्या मागून आल्या–गेल्यांनीं घंटा वाजविली, मी घंटा वाजविली.

त्यांच्या हातानं पावन झालेली ही घंटा, माझा हात पोहोंचतोय म्हणून मीही वाजवावी काय ? काय हरकत आहे ? महार-मांग सुद्धां ही घंटा वाजवून गेले असतील.

होय, महार-मांग सुद्धां ही घंटा वाजवून गेले आहेत. हा सभामंडप मूळचा नव्हता. पुष्कळ मागाहून बांधला हा. मूळचं देऊळ ह्या घांटीच्या

मंडपाइतकंच. आतां, हा सभामंडप बांधल्यापासून महार-मांगांचा हात ह्या घंटेला लागेनासा झाला. सभामंडप नव्हता तोंपर्यंत ह्या घांटीच्या मंडपांत यायला कुणाला मज्जाव नव्हता. महार-मांगांनीं ही घंटा वाजविली असेल. —एक इतिहाससंशोधक माझ्या कानाशीं कुजबुजला.

मला धीर आला. कुठं समर्थ-आणि कुठं महार – मांग ? मग मी घंटा वाजवली म्हणून काय बिघडलं ? ह्या मंडपाला कांऽहीं वावडं नाहीं ! सगळ्यांचे घंटानाद त्यानं साठवले आहेत. जातीचा काय प्रश्न ? संत काय एकाच जातींत होतात ? आणि वेदान्त काय तेवढ्यांनाच कळतो ? प्रत्येक जण थोडा फार वेदान्ती असतोच कीं ! डोकं दुखतंय, सुंठ घाला; पोट दुखतंय, ओवा खा; इतकी वैद्यकी प्रत्येकाला येते. त्यानें माझा बांध रेटला, – चावडीवर खेचा त्याला; त्यानं असं असं वंगाळ काम केलं, – वाळीत टाका त्याला; इतका वकीली सल्ला द्यायचं सर्वांना समजतं. त्याच माफक प्रमाणांत वेदान्तही प्रत्येकाला येतो.

‘ कोण आहे ? ’ ह्या प्रश्नाला –

‘ मी आहे ’ हें उत्तर बरोबरच आहे. ‘ मी’ही आहेच कीं कोणी तरी थोडा – थोडासा.

रामदासस्वामीनीं वाजविलेली घटा ह्या मंडपांत घुमून राहिली आहे. शिदनाक महार – स्वामीकार्यी, शिवाजी महाराजांच्या सेवेंत तरवार गाजविणारा तो महार – रामदासस्वामीनीं त्याला काय हरकत घेतली असेल ही घंटा वाजवायला ?

त्याच्या वंशजानेंही पेशवाईत तोच मान मिरवला. श्रीमंत पेशवे निजामावर चाल करून जायला निघाले. झाडून सारे सरदार आपापल्या पथकानिशी डेरेदाखल झाले. सैन्याचा तळ पडला. शिदनाक महार – मूळ पुरुषाचं नांव सार्थ मिरविणारा वंशज शिदनाक महार – त्याचाही तंबू मिसलीनं उभा राहिला. कांहीं ब्राह्मणी सरदारांना मळमळ वाटूं लागली. श्रीमंतांच्या कानावर कुरकुर आली. श्रीमंत मोठे चतुर धोरणी. सदरेला बसले असतांना, अशाच एका तरवारबहाद्दर ब्राह्मण सेनानी पुढं त्यांनीं ती कुरकुर मांडली. त्या भटानें ताडदिशी उत्तर दिलं “ कुरकुर करणारांना

म्हणावं, इथं काय भोजनाची पंगत आहे ? हें रणचंडीचं नवरात्र आहे. इथं शौर्याखेरीज कोणतंच सोंवळं ओळखलं जात नाहीं. तरवारीच्या तोलानं थाटलेल्या ह्या मिसलींत जानव्याची लुडबुड नको. ”

राम कोदंडधारी !

पण हें तत्वज्ञान पुढं उरलं नाहीं.

पुढं हा भव्य सभामंडप बांधला. पण ह्या घांटीच्या मंडपांत पहिला शिदनाक महार आला असेल, त्यानं ही घंटा वाजविली असेल. रामदासांनीं वाजविली, शिवाजी महाराजांनीं वाजविली, शिदनाक महारानं वाजविली, आणि आजवर कोटयावधी यात्रेकरूनीं वाजविली ती ही घंटा.

मी वाजवतों ही घंटा. मलाही थोडा प्रपंच कळतो, थोडा परमार्थ कळतो, थोडा वेदांत कळतो. निदान घंटा वाजवायचं कळतं. गुडघ्या-एवढया कला-कुमारांच्यांत देखील ती हौस आहे. त्यांनीं कुठं एव्हढा विचार केला आहे पात्रापात्रतेचा ?– “ मी–मीं ” म्हणून पुढ घुसतांना ?

तसं पाहायचं म्हटलं तर समोरच्या सिंहासनावरील ध्यानाचंही–रामदासस्वामीच्या आवडत्या ध्यानाचंही आम्हांला अवधान राहिलं नाहीं ! कोदंडधारी रामाऐवजीं ‘ बद्धपद्मासनस्थ ’ राम आम्ही चितूं लागलों.

लक्ष्मण भावोजी मागें, पुढें स्वामी
मज आहे धामीं ऐसें वाटे

असें गात चाललेली वनगामिनी वाटसरू सीता समोर असूनही आम्ही ‘ वामांकारूढ सीता ’ ध्याऊं लागलों. त्याचप्रमाणें रामनामी पांघरत राहिलों; कुबडी मिरवीत राहिलों; पण त्या क्रान्तिकारक संताच्या हेतूंची कुठं बूज ठेविली आहे ? तें कांहींही असलं तरी—

रामदासस्वामींनीं बांधलेला हा घांटीचा मंडप सगळयासाठीं आहे; मंडपांतली ही घंटा सगळयांनीं वाजवावी.

म्हणून, मी ही घंटा वाजवितों.

---

# निष्ठावन्ता असो नमस्कार– : १६

'एकनिष्ठांना असो नमस्कार!' समोरून येणाऱ्या परिचितास पाहून नमस्कार करतांना मी म्हणालों.

'कां, काव्यस्फूर्ति व्हायला लागली वाटतं!'

'आपलाच प्रभाव! रामचरित्रानं काय थोड्या–थोडक्यांना बोलकं केलंय! मोरोपन्तानें तर अष्टोत्तर शत रामायणें लिहिलीं. घराला जसं दार तशी मनुष्याला कवित्वशक्ति ही असतेच. वैभवशाली लोकांच्या घराला म्हणजे प्रासादाला महाद्वार असतें. दरवाजा हा मध्यम प्रकार. कंगालांच्या घरकुलाचें दार – दार कसलें तें, थोरांच्या तुलनेनें दिण्डीच ती. दिण्डीइतकी कवित्वशक्ति असली तर त्यांत आश्चर्य कसलं!' एवढें वक्तव्य [ आणि तेंहि श्लेषप्रचुर वक्तव्य ] ऐकल्यावर तो मला आणखी काय विचारणार? तरी पण तो म्हणाला—

'नमस्काराची मळमळ अजून नाहीं जात. कांहीं मात्रा—"

'मात्रांचा नि माझा तसा काय संबंध आहे? मी कांहीं प्रतिभाशाली कवि नाहीं हें आतां तुला निराळें सांगायला नकोच! शिवाय, तसल्या मात्रांनीं तुझें पित्त उलट भडकायचेंच! बरं, असा रस्त्यावर वाटेल तेव्हां खिशांतून बटवा काढायला मी काय धन्देवाईक आयुर्वेदाचार्य आहे?' माझ्या नादीं अधिक लागण्यांत अर्थ नाहीं असा विचार करून त्यानें पाय काढता घेतला.

'जें आपल्याजवळ उणें तें दुसऱ्याजवळ आढळल्यावर तो वन्दनीय वाटतो' हा मानसशास्त्रांत सांगितलेला मनोधर्म मी त्याला ऐकवला; पण तो पाठमोरेपणींच.

सरबत पिऊन झालें तरी ज्याप्रमाणें मागें रुचि राहतेच, त्याप्रमाणें तो दूर निघून गेला तरी, 'एकनिष्ठांना असो नमस्कार' हा चरण माझ्या जिभेवर घोळतच राहिला – केवळ कवित्वाच्या ममत्वामुळेंच कांहीं नाहीं, तर खरोखरीच मला अशा एकनिष्ट व्यक्तीबद्दल आदर वाटतो म्हणून. कारण, जिकडे पाहावें तिकडे या गुणाची वानवाच आढळून येते. बोलांत बोल नाहीं,

कृतींत मेळ नाहीं, आचारशुद्धतेबद्दल तर – पण, माझ्या पायाखालीं तरी काय जळतेय ? आपलें नाक नीट नसणाऱ्यानें दुसऱ्याच्या नकटया नाकाला हसायला कशाला हवें ? पण मी दुसऱ्यांना हंसत नाहीं, दुसऱ्यांना निंदीत नाहीं; तर, दुसरे कसे आहेत तेवढेंच सांगतो. बोलण्यांत, चालण्यांत, करण्यांत कांहींच नेम नाहीं असेच सारे [ माझ्यासहित ] आहेत– यच्चायावत मनुष्य-प्राणीच असा आहे. तेव्हां, दुर्मिळ गुणाचें वसतिस्थान आढळल्याबरोबर त्याच्यापुढें माथा विनम्र व्हावा हें स्वाभाविक नाहीं काय ?

प्रभु रामचंद्र एकवचनी, एकबाणी, एकपत्नी, सारांश एकनिष्ठ होता. म्हणून अवतार–मालिकेंत समाविष्ट होऊन अखिल आर्यावर्ताला वन्दनीय झाला. त्यागबुद्धि हा एकुलता एक गुणसुद्धां ह्या स्वार्थी जगांत किती महत्वाचा आहे. प्रेयसीसाठीं प्रियकरानें मस्तकावरचा राजमुगुट आणि हस्तांतील राजदण्ड खालीं ठेवणें ही त्यागबुद्धि ब्रिटिश रियासतीनें नुकतीच प्रगट केली तेव्हां अवघें विश्व विस्मयचकित झालें. सहधर्मिणी कां सम्राटपद असा त्यांत पेंचप्रसंग होता; आणि सखिसाठीं सिंहासनाचा त्याग करण्यांत अखेर प्रेमविजय तरी झाला. पण प्रभु रामचंद्राचा राज्यत्याग निखालस त्याग होता. पित्याला वचनभंगाच्या दोषापासून मुक्त करण्यासाठीं पुत्रधर्मानें तो ऐन राज्याभिषेकाच्या वेळीं वनवासाला उद्युक्त झाला. बाकी, खरें म्हणजे दशरथाच्या हातून वचनभंग झाला असता तर तो अधर्म ठरला असता असें, त्यानें काय किंवा त्याच्या पुत्रानें काय, भय मानायचें कारण नव्हतें. सहधर्मिणीपदावरून सारथ्य करणाऱ्या कैकेयीच्या प्रसंगावधानी धैर्याचें पारि–तोषक म्हणून ते तीन वर तिला देऊं केले होते. पण पतिहेतूशी जेव्हां तिनें विरोध आरंभिला, म्हणजे सहधर्मिणीपणापासून जेव्हां ती च्युत झाली, तेव्हां तिचा त्या 'वरा'वरील हक्कच उडतो. पण इतका सरळ सरळ न्याय्य युक्तिवाद अवलंबिला असता तर तो रामावतार कसला ! आणि म्हणूनच ' काय हें अलोकसामान्य चारित्र्य ' असे उद्गार निघतात.

आतां, सभोंवती पाहावें तों अगदीं क्षुल्लक बाबतींतसुद्धां आमची अन्याय्य स्वार्थलोलुपता दिसून येते. शेजाऱ्यानें अंगणांत वाळवण घातलें असलें तरी त्याकडे सुद्धां आमची वानरदृष्टी आहे. कवि असें म्हणतात कीं–

स्वधामासि जातां रघू रामराजा ।
हनूमंत तो ठेविला ह्याचि काजा ॥

पण तो हनुमन्तही उड्डाण करून कधींच गेला आणि तें परित्राण–कार्यही समाप्त झालें. आतां फक्त त्याची वानरसेना मात्र सर्वत्र वावरत आहे. निष्ठुर अपहारबुद्धि बेशरमपणानें कसा नंगा नाच घालीत आहे हें प्रत्येक ऋणको जळजळीतपणानें अनुभवीत आहे, आणि प्रत्येक धनकोला ( शक्य असेल तर ) आत्मनिरीक्षणानें उमगतां येईल. माझ्या शेजारचें एक मसालेवाईक उदाहरण सांगतों. कुटुंबांतील कर्ता पुरुष कर्जबाजारीपणांत निवर्तल्यामुळें त्याची बायको–पोरें उघडीं पडलीं. सावकार बिऱ्हाडकरूच्या नात्यानें पूर्वींच जो घरीं येऊन राहिला होता त्याला ऋणकोचें तें सगळेंच घर घशाखालीं टाकण्याची ही संधि आली. "माझ्याकडे हें घर कर्जापायीं गहाण आहे" असा पुकारा करून त्या अनाथ बायका-पोरांना खरोखरीच उघड्यावर हुसकून लावण्याचा आणि आपण त्या घरांत कायमचा पाय रोवण्याचा त्यानें व्यूह रचला. शेवटीं, त्या अनाथांचा एक वाली उभा राहिला. त्यानें गहाणखताची मागणी केली आणि तें ( मुळांतच नसल्यामुळें ) पुढें येत नाहीं असें पाहून त्या सावकाराच्या दण्डेलीवर दण्डेलीचाच उपाय योजिला. ऐन वर्षाऋतूच्या तोण्डाला त्याच्या बिऱ्हाडावरील कौलार शाकारणीच्या निमित्तानें जें खालीं उलगडून ठेवलें तें ठेवलेंच ! आतां, पर्जन्यास्त्र कोसळणार आणि आपणास महा ठक भेटला हें उमजून सावकारानें तिथलें आपलें चंबुगबाळें उचललें! सत्वगुणी त्यागमूर्ति प्रभू रामचंद्राच्या पदरजानें पावन झालेल्या ह्या दण्डकारण्यांत अपहारबुद्धीच्या दण्डेलीचे असले किंबहुना याहूनही चीड आणणारे सावकारी प्रकार आमुच्या दृष्टीआड हरहमेश चालत असतील !

पण, वन्दनीय म्हणजे अनुकरणीय नव्हेच. आम्ही 'नमस्कार' करतो ह्याचाच गर्भितार्थ आम्हाला दोन हात दूर राहायचें आहे,–आचार ठेवायचा नाहीं. निजधामाला गेल्यावर रामरायाला भारतवर्षाचा इतिहास वाचायची पाळी आली असेल तर त्यालाही कळून चुकलें असेल कीं आपल्या अवताराला मागें सारणारा कृष्णावतार भरतखंडांत होऊन गेला. कृष्णाव-

तार हाच व्यवहारी जनांचा आवडता अवतार. उगीच नाहीं कृष्णभक्ति आसेतुहिमाचल फोफावली! कुणालाही आपलें आपमतलबी तत्वज्ञान कृष्णचरित्रांत हुडकतां येते. असें ऐसपैस सोईस्कर कृष्णचरित्र अधिक अनुकरणीय नव्हें का? दुभत्याच्या कपाटांतील दही-दूध-लोणी चोरून खा, कान्हा तुमचा पाठीराखा आहे. आळींतल्या पोरीबाळींच्या खोड्या करा, नंदकुमार तुमचा कैवारी आहे. कपट करा, शब्दछल करा, पार्थसारथ्याची तुम्हाला मुभा आहे. भारतीय युद्धाच्या वेळीं दुर्योधनानें कृष्णाजवळ त्याच्या सैन्यबलाचें साह्य मागितलें. सेना आणि सेनापति हीं अलग अलग असूं शकतात हें त्या योद्धयाला काय ठाऊक? देशोदेशींचे राजेरजवाडे आपापल्या दलभारासमवेत जसे त्याच्या छावणीभोंवती गोळा झाले होते तसाच यदुकुलतिलकही साध्य होईल ही त्याची साह्य मागण्यावेळची अपेक्षा. पण कृष्णानें त्याला चकवून मूर्खात काढलाच कीं नाहीं! बरें तर बरें, नाही तर "सेना तुझ्याकडे येईल पण ती सुद्धां हातांत शस्त्रें धरणार नाही" अशी त्यानें अट घातली असती तर दोन तोण्डांत मारून घेऊन, गदा आपटीत चालूं लागण्या पलीकडे तो कौरवेश्वर काय करणार होता? सारांश, कृष्णचरित्र म्हणजे मतलबसिंधू. ज्याला जितकें जमेल तितकें त्यानें त्यांत खुशाल डुंबावें. आणि तसें केलें नाहीं तर निभावच लागायचा नाहीं ह्या भामटेगिरीनें भरलेल्या जगांत. मला सुद्धां कृष्णच सखा वाटतो आणि राम देव वाटतो. रामसेवेचें ब्रीद मिरविणारे रामदासस्वामी हे सुद्धां माझ्याच मताचे असावेत. एरव्हीं त्यांनीं "प्रसंग पाहोनि वर्तावें" किंवा "जातें स्थळ सांगो नये। सांगितल्या स्थळीं जाओ नये" असला, रामचरित्राशीं विसंगत उपदेश केलाच नसता. रामाचें तें चारित्र्य अतिमानुष कोटीतलें! म्हणून, मनुष्यांनीं गजबजलेल्या ह्या मतलबी जगांत अतिमानुष रामाच्या त्या कडकडीत एकनिष्ठ आचाराची-पुसट का होईना-जिथें प्रचीती येते "तेथें माझे कर जुळती" व जिव्हा आपोआप गुणगुणूं लागते कीं, "एकनिष्ठांना असो नमस्कार!"

ह्या गुणगुणण्यांत सुद्धां मी एकनिष्ठ नाहीं. आर्यश्रेष्ठाची महति गावयाची तर आर्या आळवावी अशीही मला एकादे वेळीं स्फूर्ति होते आणि रुचिपालट म्हणून मी गाऊं लागतो कीं "निष्ठावंता असो नमस्कार!"

# बिऱ्हाड–बदल ! : १७

एका जिवलग मित्राच्या पत्राला उत्तर लिहावयाचें होतें. पत्र आलें तेव्हां बिऱ्हाड बदलण्याच्या गडबडींत मी होतों. मामुली क्षेमसमाचाराचीं आणि हालहवालीचीं पत्रें केव्हांहि लिहितां येतात. पण तशाप्रकारचें हें प्रत्रोत्तर मला लिहायचें नव्हतें. कविता लिहायलाच स्फूर्ति नि लहर लागतें असें नाहीं कांहीं पत्रें देखील मनाच्या एकाग्रतेंतच लिहायचीं असतात. म्हणून, नव्या जागीं गेल्यावरच जरा निवान्तपणीं उत्तर लिहायचं मी ठरविलं होतं. नव्या जागेंत येऊन आतां पांच सात दिवस होऊन, जरा स्थिर झालों होतों. पत्र लिहायला बसणार, इतक्यांत आमच्या शाळेंतील एका शिक्षकबन्धूची रजेची चिठ्ठी घेऊन एक गृहस्थ आले. चिठ्ठीसाठीं हात पुढें करीतच मी विचारले "कां हो, कां येत नाहींत आज जिवाजीपन्त ?"

"अहो विचारतां कशाला ? आरसाच आहे ना हातांत ! मी तर न पाहतांच सांगतों कीं, बहुतेक बिऱ्हाड बदलण्याच्या धान्दलींत असतील ते !"

"म्हणजे दर तिमाहीला हे जागा बदलतात कीं काय ?"

"तिमाहीला ? आपल्यावरून जगाची पारख करतां वाटतें ? अहो, महिन्यांतून तीनदां बिऱ्हाड त्यांनीं बदललं तरच काय तें आतां आश्चर्य करायचें त्यांच्या बाबतीत ! बरं आहे, जातों आतां मी."

"बसा कीं हो ! जाल, काय घाई आहे ?"

"नाहीं, जातोंच ! येईन केव्हां तरी सावकाशपणें. अजून तुमची तरी कुठें नीट माण्डामाण्ड झाली आहे ?"

× × ×

ते गृहस्थ केव्हांच गेले. पण त्या बिऱ्हाडनाचऱ्या मास्तराचें मात्र मला एकसारखें नवलच वाटूं लागलें. बाकी, तसं म्हणायचं तर, तीनच महिने झाले मला त्या साळसुद्यांच्या वाड्यांत रहायला जाऊन. पण मी नाहीं का परवांच तेथून बिऱ्हाड हालवून इथें आलों ? केव्हढी गैरसोय आहे बिऱ्हाड बदलण्यांत ! पुर्वीच्या काळीं एक राजवट जाऊन दुसरी राजवट सुरळीत चालू लागेपर्यंत मध्यंतरीं बराच बखेडा माजत असे. तशीच अवस्था होते

बिऱ्हाड बदलण्यांत.

नवीन जागीं एकदां मनाजोगी स्थिरस्थावर झाली कीं, मग जिवाला बरें वाटतें. आपल्या कल्पनेप्रमाणें आपल्या गरजेच्या व शोभेच्या वस्तूंना व्यवस्थित जागा मिळेपर्यंत आपणाला नव्या घरांत नीट नान्दतांच येत नाहीं; अगदीं उपरीपणा वाटतो. दुसऱ्याच्या घरीं पाहुणे म्हणून गेलों असतां जसें टांगल्यासारखें वाटतें, तसेंच स्वतःच्या नव्या घरांतहि वाटतें. घरांतल्या गैरसोयी अंगवळणी पडेपर्यंत आणि सोयींचा जिव्हाळा वाटूं लागेपर्यंत बेचैन होतों आपण. नववधूला सासरीं कसें वाटत असेल ह्याची कांहींशी जाणीव अशा बिऱ्हाड बदलण्यावरून करतां येईल. सयाजी- रावांच्या वाड्यांतील तीं माझी जागा किती तरी चांगली होती. भर वस्तींत असूनहि वर्दळीपासून अलिप्त. त्यांतून तो तिसरा मजला! एखाद्या बालेकिल्ल्यांत राहिल्याप्रमाणें निर्धास्त वाटे. तिथून दिसणारी ( रस्त्यांतल्या रहदारी ऐवजीं ) अन्तरिक्षांतील रहदारी किती तरी प्रेक्षणीय! तशांत सयाजी- रावांच्या मर्जीमुळें साध्य झालेल्या सोयी आणि मिळालेल्या खास सवलती-- सगळ्यांना माझा हेवा वाटे तिथें.

सारांश काय, ती जागा किती गुणसंपन्न. पण त्याहि जागेंत मधून- मधून मला दोष दिसूं लागत. दोषजन्य संतापाच्या तिरिमिरींत मी शेकडों जागा शोधूनहि पाही; पण त्यापेक्षां अधिक तर जावोच पण तितक्या सोयी देखील एका ठिकाणीं मिळत नाहींत असें आढळलें कीं, त्या जागेबद्दलचें ममत्व दुणावे. तरी पण, अखेर एकदां स्थलांतर करणें अवश्य झालें. मग निवडली ती साळसुद्यांची जागा!

साळसुद्यांची ती जागा सकृद्दर्शनीं तरी किती सोयीची वाटली. दारांत डोलणारा प्रफुल्ल सोनचाफा; खिडकी-खिडकींतून डोकावणारी यौवनमत्त रातराणी, ज्योतिष्मतीशीं स्पर्धा करणाऱ्या त्या जाईजुई, रुप्याच्या घवघवीत दागिन्यांनीं मढविलेल्या भिल्लिणीप्रमाणें दिसणारी ती मागीलदारची तगर; बैठकीच्या खोलींतील ती भव्य खिडकी-कीं जिच्यांत दोन्ही बाजूला सुन्दर पुतळे उभे करतां यावेत अशी बैठक असलेली- अशा सर्व सजावटीमुळें त्या जागेंतील दोषांकडे प्रथम माझी नजर जाऊं शकली नाहीं. नाहीं म्हणायला

एक फरक उघड होता; सयाजीरावांच्या वाड्यांत मी सिंहगडावर असल्या-सारखा राहात होतों, तर इथें अगदीं तळमजला मिळणार होता. पण समजून उमजूनच मी हा फरक पत्करला. विमानांतच सर्व सुख आहे असें नाहीं. तलावांत डुम्बणें देखील कांहीं कमी रम्य नसतें.

तिथें प्रवेश करतांना आम्ही आपापसांत बोललों देखील कीं, आतां इथून लवकर हालायची पाळी न येवो.

पण म्हणतात ना, तसेंच झालें. लग्न पाहावें करून आणि घर पाहावें बांधून; –थोडासा फरक करतों मी ह्या म्हणीच्या उत्तरार्धांत–घर पाहावें नान्दून. दुरुन साजऱ्या दिसणाऱ्या डोंगराप्रमाणें किंवा निर्मळ वाटणाऱ्या तलावाप्रमाणें, नवीन जागाहि प्रथमदर्शनी चांगली दिसली तरी तिथें रहा-वयास गेले कीं, कळून येतात तिच्यांतल्या खतखोडी. कुठें कपाटच बसत नाहीं, तर कुठें हव्या असलेल्या ठिकाणीं खाटच मावत नाहीं. त्या कोपऱ्यांत मेज मांडलें तर डावीकडील उजेड मिळत नाहीं, अन् ह्या कोपऱ्यांत मांडलें तर आल्यागेल्याकडे पाठ होते. एक ना दोन, अनेक अडचणी. पुतळे ठेवतां येण्यासारखी ती खिडकी; पण गरिबांचा प्रपंच म्हणजे नगरमन्दिरां-तील प्रदर्शन नव्हे. सारांश, घरांत नान्दायला गेलें कीं कळतें तें कितीसें सुखावह होईल. ताजमहाल झाला म्हणून काय झालं ? कुणाही मोंगल बादशाहाला तिथें आपला संसार थाटतां आला नसतां; मग तुम्हां आम्हां गरीबांची गोष्ट दूरच !

प्रेमविवाह देखील कां दुःखपर्यवसायी होतात आणि पुनर्विवाहाला युवतींचें मन कां कचरतें ह्याची मीमांसा मला आतां करतां येईल.

मरणाला मनुष्य बिचकतो त्याचें सुद्धां मर्म हेंच. कुणास ठाऊक नवीन जगांत काय सोयी-गैरसोयी आणि कुणाकुणाची बरी-वाईट संगत वांट्याला यायची आहे ? हातचें सोडून पळत्याच्या पाठीं लागण्यांत व्यवहारशून्यताच नाहीं का व्यक्त होत ? आगीची देखील एखाद्याला सवय झाली म्हणजे असें वाटूं लागतें कीं, " आगींतून फोफाट्यांत पडायला नको. आहे हेंच ठीक आहे. एकदां एक प्रयोग केला; नफा किंवा नुकसान-कांहीं तरी वांट्याला आलें; चला, आतां तेंच भोगूं " हीच मनुष्याची विचारसरणी.

पुन्हा-पुन्हा प्रयोग करण्याची उमेद मनुष्याला नसते. एंजिनांत कोळसा सारणारे लोक फुलमाळी व्हायला कुठें जातात? म्हणजे 'फुलमाळी होणें वाईट' असें कांहीं त्यांचें मत नसतें. नाका-तोण्डांत जाऊन गुदमरून टाकणारा धूर, कानठळ्या बसविणारा एंजिनाचा धडधडाट आणि सर्वांगावर बसणारीं कोळशाच्या काळोखीचीं पुटें, हें काय वैभव आहे? फुलांचें सौन्दर्य आणि सुगन्ध व त्या फुलांनाहि लाजविणारीं नाजुक गिऱ्हाइकं ह्यांच्याकडे पाहून पाहून धुन्द झालेला माळी शिळोपाकी मीठ-भाकरी खातांना समोरच्या मिठाईवाल्यालाहि हिणवीत असेल. म्हणून, हलवाई कांहीं फुलवेण्या विकायला लागत नाहीं आणि बडतर्फीची आपत्ति ओढवली तरी कोळसेवाला दुसऱ्या धन्द्याच्या वाटेला जात नाही. जे अंगवळणी पडलें तेंच कांबरूण घेऊन त्याच्या अडोशाला मिळतील ते घांस तो घशाखालीं घालीत असतो. कांहीं अप्रिय असणाऱ्या बाबी 'अनिर्वाह पक्ष' म्हणून पत्करून मनुष्य निर्वाह करूं लागतो.

जगाबद्दलहि हीच विचारसरणी. 'जवाएवढें सुख आणि पर्वताएवढें दुःख' ही इहलोकाच्या वास्तव्याची गोळाबेरीज पुरेपुर माहीत असून आणि सुरलोकाची हरिदास-पुराणिकांनीं गायिलेली मिट्ठास वर्णनें सतत कानांवर पडत असूनहि जगांतून पाय काढायला कोण तयार आहे? मोळ्या वाहून-वाहून मेटाकुटीला आलेला मनुष्य मरणाला हांका मारील; पण मरण पुढें उभें ठाकूं द्या, मोळी माथ्यावर घेऊन त्यानें बाजारांतच धूम ठोकली नाहीं तर कशाला? ती कजाग बाईल, ती खाऊं-कीं-गिळूं करणारीं पोरं, आणि उद्यांच्या पिठामिठाची ती जीव करपविणारी विवंचना-सगळं सगळं तो पत्करील. वर्तमानपत्रांतल्या ह्या नोटीसा तरी काय सांगतात? आपली वास्तपूस न करणाऱ्या दादल्याला ह्या कायद्या-वायद्याच्या धमकावण्या कशाला? भंग पावलेला घरोबा धमकावण्यांनीं सांधला जातो कां? आणि, सांधला गेला तरी त्यांत कितीसा गोडवा उत्पन्न होईल? तडा गेलेली कांच चिकटविल्यावर ती टिकायला किती तरी जपणूक करावी लागेल! कोणी कायदेबाज माझे हे प्रश्न ऐकून हंसेल. "अहो, ह्या नोटीसा म्हणजे पळपुट्या बाईनें पत्करलेल्या वाटेला कायदेशीरपणा आणण्याची ही मखलाशी असते

नुसती ! घरांतून बाहेर पाऊल टाकणारी बाईल परत यायची थोडीच इच्छा धरते ? हाच त्या हंसण्याचा अर्थ. असेल, हाही अर्थ बरोबर असेल त्यांच्या अनुभवानें. पण, मला वाटतें, ती नोटीस देणारणीच्या मनांत असें नसेल कां येत कीं, नव्या म्होतुरानें जवळ केलेला धनि तरी आपल्याला दगा देणार नाहीं कशावरून ? त्यापेक्षां एकदां ज्याला प्रथम आपला म्हटलं तोच फिरून जर आपला होत असेल तर ठीक नाहीं का ? उच्च वर्णीयांना लैंगिक मानसशास्त्र आणखीहि ज्यास्त प्रकाश पाडील ह्या मुद्यावर. पण तितकें खोलांत न शिरतांहि चटकन् दिसणारें कारण हेंच आहे की, फिर–फिरून प्रयोग करून पाहण्याला मनुष्याची तयारी नसते.

ज्या परिवार–पसाऱ्याचें एकदां ममत्व निर्माण झालें त्याचा लोभ सहसा सुटत नाहीं आणि त्यांतील दोषांकडे डोळेझांक करण्याची वृत्ति उत्पन्न होते

मनुष्य खरोखरीच मरायला तयार होतो, तेव्हां त्याला कोणत्याहि विषयाची आसक्ति उरलेली नसते किंवा आसक्तीला विषय उरलेला नसतो, आणि विषय असूनहि त्याच्या आसक्तीच्या आधारानें जगांत रहायला इतक्या जबर वेणा द्याव्या लागतात – हालअपेष्टा भोगाव्या लागतात की, त्यापेक्षां मरण्याचा मार्ग – अगदीं अज्ञात, अंधकारमय मार्ग पत्करावयाची त्याला दिक्कत वाटत नाही. जगाची अशी जी शिसारी येत असेल तिचाच अनुभव मी त्या साळसुद्यांच्या बिऱ्हाडीं घेतला; म्हणून ह्या नव्या जागीं आलों – पावसाळ्यांत सामान हालविण्याचें दिव्य पत्करून आलों. जगांत कांहींच निर्दोष नाहीं आणि त्या दोषयुक्त जगांतलीच एक कणिका ही नवीन जागा. पण आतां दोषांकडे शक्य तों दुर्लक्ष करण्याच्या नेहमींच्या धोरणाचाच मला निर्धारानें अवलंब करणें भाग आहे. कारण उघड आहे – फिरून प्रयोग करण्याची आतां माझी इच्छा नाहीं आणि तशी पाळीही येऊं नये ! त्या बिऱ्हाडनाचऱ्या मास्तराप्रमाणें मला आयुष्यभर उडतपगडें व्हायचें नाहीं.

---

## उधळपट्टी : १८

**माझ्याबद्दल** माझ्या त्या शेजाऱ्यांचा फार चांगला ग्रह असेल असे मी मनांत मांडे खात होतों. पण माझ्या एका मित्राजवळ त्या शेजाऱ्यानें जी तक्रार केली ती ऐकल्यावर, माझ्यापुढचें ताटच ओढलें गेलें. मला विचार पडला कीं असें काय घडलें आमच्याकडून कीं तें त्यांना खपूं नये !

आमच्या घरांतला केर त्यांच्या दारांत आम्ही लोटून दिला नाहीं. त्यांच्या अंगणांत पडलेल्या फुलांना हात लावला नाहीं. सांपडलेल्या वस्तू लगेच त्यांच्या त्यांच्याकडे पोंचत्या करायची खबरदारी आम्ही प्रौढ तर घेत आलोंच, पण आमच्या मुलांना सुद्धां तें वळण लावलें आहे आम्ही. त्यांच्या मुलांना कधीं हुडुत-फुडुत केलं नाहीं; इतकेंच नव्हे तर, ती मुलें आमच्या घरांतच खुषीनें रमतात. माझी बायको उठल्या-सुटल्या त्यांच्याकडे कधींही उसनें-पासनें मागायला जात नाहीं, कीं कुणाची निंदानालस्ती करण्यासाठीं त्यांच्या उंबऱ्यांत पाऊल टाकीत नाहीं. रेडिओ आमच्याकडे मुळीं नाहींच. फोनो रात्रीं-अपरात्रीं किंवा दुपारच्या वामकुक्षीच्या वेळीं लावायचा नाहीं, ही जशी माझी घरांत सक्त ताकीद आहे तशीच, मुलांनीं काय खेळ खेळायचे असतील ते क्रीडांगणावर खेळावेत- घरीं सौंगड्यांना जमवून अंगणांत धांगड-धिंगा घालूं नये, अशी माझी कडक सांगी आहे. मग, काय कारण सांपडलें आमच्या शेजाऱ्यांना कुरकुरायला ?

माझा मित्र म्हणाला, " थांब, सांगतों कारणें. तुझे शेजारी म्हणतात 'काय हो ही मंडळी ! भिकाऱ्यांना ह्यांनीं लाडावून ठेवलं आहे. आम्ही त्यांना हाकलावं आणि ह्यांनीं त्यांना थांबवून घ्यावं ! तशीच येणारी मंडळी, रात्रीं दहा दहा वाजेपर्यंत येतच असतात ! खर्चाला तर कांहीं सुमारच नाहीं ! पाहुणे आणि चहापाणी ह्यांना खळ नाहीं ! दारांत मोटरी येऊन थडकत असतात आणि टांग्याशिवाय यांचं पाऊल बाहेर पडायचंच नाहीं ! छे, छे, आपण नव्हती पाहिली असली उधळमाधळ ! "

ही त्यांची तक्रार बरोबर आहे. पण आमची ही राहणी शेजाऱ्यांच्या तक्रारीचा विषय व्हावी याचें मला नवल वाटतें.

खरें म्हणजे, आम्ही त्यांच्या काटकसरी टापटिपीच्या राहणीचें कौतुक करीत होतों. त्यांच्या घरीं कधीं अवांतर वेळीं कप-बशीचा आवाज ऐकूं यायचा नाहीं. आल्या-गेल्यामुळें दिवाळी-दसरा साजरा झालेला आढळला नाहीं! पांचाच्या ऐवजीं दहा चुळा चांगल्या खळखळून भरल्या म्हणजे मुखशुद्धीची गरज काय, असा त्यांचा प्रश्न असे. 'साप म्हणूं नये धाकला' ह्या धाटणीवर 'व्यसन म्हणूं नये क्षुल्लक' असें त्यांचें धोरण असून, त्यांनीं पानसुपारीला देखील मनाई केली आहे घरांत. त्यांच्या दारावर टकटक करील काय तो एक गवळी! दिवसांतल्या तिन्ही डिलेव्हरींना आमच्याकडे टपाल येई; पण त्यांच्या टपाल-पेटींत गांधिल माशांनीं घर केलं आहे आज कितीक दिवस! दिवेलागणीलाच मध्यरात्र होते त्यांच्याकडे! रोजची कमाई इतकी खुळखुळायची कीं— आमचें भाग्य तसं असतं तर आमच्या तबेल्यांत प्रशस्त मोटरच फुरफुरली असती! पण, त्यांनीं आपलं "पादचारी" हें ब्रीद सोडलेलं नाही!

लक्ष्मी चंचल असते. तेव्हां तिच्या पळायच्या साऱ्या वाटांची अशी नाकेबंदी करायला हवीच नाहीं तरी! नाहीं तर, आम्ही! "पळतेस? पळ बाई! सारीं दारं नि खिडक्या सताड खुलीं आहेत तुला!" असेंच जणुं कांहीं आम्ही म्हणत होतों आमच्या वागणुकीनें. त्यांच्या त्या राहणीचें आम्हीं कौतुक केलें आणि निरीक्षणही केलें; पण, आम्हांला अनुकरण मात्र करतां आलें नाहीं. काटकसर हीच एक उत्पन्नाची बाब आहे; आणि आद्यापेक्षां ज्याचा खर्च ज्यास्त त्याच्यासारखा दरिद्री नाहीं व खर्चापेक्षां ज्याचा आदा अधिक त्याच्यासारखा श्रीमंत नाहीं, अशा अर्थाच्या सुभाषितांचें बाळकडू त्यांनाच तेव्हढें पाजलें होतें आणि आम्हाला उधळपट्टीचे वस्तुपाठ देण्यांत आले होते, असंच कांहीं नाहीं. त्यांची आमची शाळा एकाच प्रकारची! पण मग आमच्या वागणींत ही भिन्नता कुठून आली?

दिनू मला म्हणतो "ते लक्ष्मीपुत्र आहेत, बाबा! लक्ष्मीपति नाहींत तुझ्यासारखे!"

खरें आहे दिनूचें म्हणणें. आम्ही आमच्या घरीं लक्ष्मीला राबवतों, तर ते पुजतात. जिथें तिची पूजा होते तिथें ती रमते. आणि जिथें तिला

वेठीला धरतात तिथून ती पाय काढता घेण्याच्या नादांत असते.

मी एकदां जागेच्या शोधांत असतांना दिनूला बोललों होतों माझ्या अपेक्षा. तेव्हां, "तुला कारकुनाला रे एव्हढी साहेबी ऐट कशाला हवी ? आतां नवीन जागा शोधायचीच आहे तर सध्यांच्या पेक्षां थोडया भाडया-चीच बघ" अशी सुरुवात करून त्यानं मला काटकसरीचें तत्वज्ञान जिव्हा-ळयानें सुनवलें. त्याच्या काटकसरीच्या धोरणानें, क-वर्गाची बिन-भाडयाची जागा आणि अन्न हीं सुद्धां चालवून घेण्यापर्यंत त्याची मजल गेली होती. पण, हा अतिरेक सोडून दिला तरी, त्याच्या उपदेशांत कांहींच गैर नव्हतें. त्यामुळें त्याचा माझ्या मनावर परिणाम झाला. मी कमी भाडयाच्या अनेक जागा पाहिल्या; पण एकही मनाला येईना. घरांतून तिनें तर निकड लावली होती एक कोणती तरी मुक्रर करण्याबद्दल. कारण, तिचे दिवस भरत आले होते. त्या रात्रीं आंथरुणावर पडल्या-पडल्या, पाहिलेल्या जागांतून मनाशींच निवड चालविली असतांना विचार आला—

"काय म्हणून मी निकृष्ट जागा पतकरूं ? पहिल्या दोन मुलांचा पाळणा ह्या प्रशस्त, हवाशीर आणि प्रसन्न बिऱ्हाडांत हालला ! आणि आतां लवकरच येणाऱ्या बालकाच्या जन्माचे वेळीं काटकसरीची कोंदट जागा ? ती कां म्हणून ? त्याच आई-बापांच्या पोटीं येऊन हा पक्षपात ? काय अपराध त्याचा ? तें कांहीं नाहीं ! त्याचंही, आपल्या भावंडांप्रमाणेंच, सर्व सुख-सोयींनीं समृद्ध असलेल्या ह्या बिऱ्हाडांतच स्वागत झालं पाहिजे. ह्याच तक्तपोशीला त्याचाही पाळणा टांगला गेला पाहिजे !" मी सकाळीं उठल्याबरोबर तिला माझा हा निर्णय सांगितला.

दिनूला, अर्थात्‌च, हा निर्णय रुचला नाहीं. त्यानें माझी आणखीही कान-उघाडणी केली. माझ्या गुरुजींचा एक उद्‌गार आठवला मला. त्यांच्या ऐटबाज राहणीबद्दल त्यांना कोणीसा एकदां इषाऱ्याचा सूचक बोल ऐकवण्याचा प्रयत्न केला. तेव्हां, ते त्याला म्हणाले होते, "हें पाहा, पुढं कधीं भिकेची झोळी आम्हांला घ्यावी लागली तरी आम्ही तुमच्या दारीं कांहीं येणार नाहीं; आणि चुकून आलोंच, तर तुम्ही भीक घालूं नका म्हणजे झालं ! आतांच कशाला ही तसदी ?" दिनूला असें उत्तर द्यायची

माझी इच्छा नव्हती. पण—

माझ्या उधळपट्टीच्या वागणुकीच्या पोटीं ( वरील जागा शोधण्याच्या प्रकरणासारखी ) जी विचारसरणी आहे ती मी सगळ्यांना कुठं सांगत बसूं? आणि त्यांना ती काय पटणार? माझ्या शेजाऱ्यांना माझ्या वागणुकीचा काडीमात्र उपसर्ग नसतांना, दिडकीच्या उसनवारीचीही तकलीफ नसतांना, केलीच कीं नाहीं त्यांनीं माझ्याबद्दल कुरकुर?

मी त्या शेजाऱ्याच्या घरांत कधीं डोकावून पाहिलें नव्हतें; तेव्हां, घरांतील भिन्तींवर कोणतीं सुभाषितें टांगलीं असतील तीं मला कशीं कळणार? पण, भिन्तीवर सुभाषितें टांगण्याची त्यांना अवश्यकता वाटेल, ही कल्पनाच मुळीं चुकीची! त्यांच्या अन्तःकरणांतच तीं कोरलेलीं असतील. कोणतीं असतील तीं? मला वाटतें—

(१) उदर-भरण म्हणजे यज्ञकर्म आहे.

(२) गरजा वाढवून गुलाम होऊं नका.

(३) आजाऱ्याला औषधपाणी करण्याची जरूरी नाहीं. निसर्गासारखा धन्वन्तरी नाही आणि नियतीपुढें कुणाचीच मात्रा चालत नाहीं.

(४) कोणत्याही नियतकालिकाचे वर्गणीदार होऊं नये.

(५) The habit of saving is itself an education; it teaches self-denial वगैरे, वगैरे, वगैरे.

खरोखर, हे जर त्यांचे दण्डक असतील तर अमेरिकेंतल्या त्या हेट्टी ग्रीनचेच हे वंशज दिसतात. दोन रेल्वे कंपन्यांची ती मालकीण होती. पण तिसऱ्या वर्गाच्या डब्यांत बसून ती प्रवास करी. हिशेब करणारानें तिची प्राप्ती मिनिटाला तीन डॉलर्स पडत असे, असें सांगितलें आहे. पण ह्या खमंग बाईनें विकत घेतलेलें वर्तमानपत्र तासाभरांत वाचून परत विकून टाकण्याचा शिरस्ता कधीं मोडला नाहीं. थंडीच्या कडाक्यांत उबेसाठीं वर्तमानपत्रांची रद्दी आपल्या अंगाभोंवतीं ती लपेटून घेई. आणि उन्हाळ्यांत होरपळून निघण्याची पाळी आली तरी ( वडिलार्जित ) पत्र्याच्या खुराड्यांत बसून चिंध्या-चिटोऱ्या चिवडण्यांत तिनें हयगय केली नाहीं. कितीक काळ ती

भिकार गल्लींत, भिकाऱ्यासारख्या वेशांत, खोटीं नांवें धारण करून राहात असे; तिच्या स्नेह्या-सोबत्यांना तिचा ठाव-ठिकाणा माहीत नसे. हा एव्हढा उपद्व्याप कां? तर, कर चुकविण्यासाठीं! खाण्यांतही असाच काटेकोर कद्रूपणा! वयाच्या ८१ व्या वर्षी अर्धांग वायूनें ही अंथरुणाला खिळली. त्या आजारांत तिची शुश्रुषा करणाऱ्या नर्सेस्ना, नेहमींचा पांढरा शुभ्र पोषाख वापरायची बंदी करावी लागली– त्यांनीं साध्या मोलकरणीसारखीं जुनेरीं वापरावीत असें सांगण्यांत आलें. कारण, इतक्या मोलाची सेवा–शुश्रुषा चाललेली पाहून, हेट्टी ग्रीनला शांत मरण आलें नसतें!

काय हें अद्वितीय आत्मानुशासन! पण अशा आत्मानुशासनानेंच मनुष्य गबर होतो, बंगले उठवतो. आणि ह्या आत्मानुशासनाच्या अभावीं, भाड्याच्या जागा बघाव्या लागतात आम्हांला! आणि शेजाऱ्यांच्या टीकेचा विषय व्हावें लागतें!

काय म्हणे, 'ह्यांच्याकडे पाहुण्या-रावळ्यांची फार वर्दळ!' मी तर हें माझें भाग्य समजतों, –ऐश्वर्य मानतों! ह्या येणाऱ्या मंडळींत खट, नट, चेट, विट ह्यांची तर वर्दळ नाहीं ना? ज्यांचे पाय घराला लागण्याची अभिलाषा बाळगावी असेच हे सज्जन आहेत. त्यांच्या आगमनानें माझ्या सौभाग्याला भरतीच येते. "आल्या – गेल्यांची सरबराई करण्यांत कद्रूपणा करूं नये, खाऊन कितीसें सरणार? व्यसनानें मात्र सरतें" वडिलांच्या ह्या शिकवणींत मी वाढलों. दसरा – पाडवा पाळायला मला पंचांग पाहावें लागत नाहीं. आयुष्य हा एक उत्सव आहे असें मला वाटतें ह्या अभ्यागतांच्या वर्दळीमुळें. काटकसरीच्या धोरणाची कांस धरून, एकलकोण्डेपणानें राहण्यापेक्षां – लोकांनीं वाळींत टाकल्यागत आपलें आपणच जिणें पत्करण्यापेक्षां, यात्रेकरूंच्या घोळक्यांत रममाण होणें किती तरी बरें!

मला माहीत आहे, कृपण मनुष्याप्रमाणें राष्ट्राची गंगाजळी होण्याचें भाग्य मला लाभणार नाहीं; किंवा आयुष्याच्या अखेरीला मोठमोठ्या देणग्या जाहीर करण्याचं ऐश्वर्य आणि केल्याची कीर्ति मला उपभोगतां येणार नाहीं. पण, मृत्युपत्र करण्याचीही मला कधीं सावधगिरी ठेवावी लागणार नाहीं. वाईट एवढेंच वाटतें कीं, ह्या राहणीमुळें, मी श्रीमंत

आहे, असा ग्रह करून चोरांनीं जर घरफोडी केली तर त्यांना नुसत्या श्रमाचे धनी व्हावे लागेल ! " आजाऱ्याला आराम पडण्यासाठीं शंभरा-शंभराच्या नोटा जाळून अंगारा लावीत जा असं डॉक्टरांनीं प्रामाणिकपणें सांगितलं तर तेंही मी करीन " असें म्हणणाऱ्या वडिलांचा मी मुलगा आहे. आणि It is a disgrace to die rich हें अँड्र्यू कार्नेजीचें वाक्य घोकणारा मी विद्यार्थी आहे. त्या नवकोट–नारायणासारखा संपत्तीचा लोंढा माझ्या घरांत येऊं लागेल अशी स्वप्नांत देखील आशा करायला आधार नाहीं. तथापि मी त्याचें चरित्र नीट पाहून ठेवलें आहे. अनेक मुखांनीं समुद्राला मिळणाऱ्या महानदीप्रमाणें आपली कमाई अनेक मार्गांनीं जनसिंधूंत मुरून जावी अशी इच्छा होती अँडीची. दररोज दहा लाख डॉलर्स ह्याप्रमाणें ३६५ दिवस तो दान करीत राहिला, अशी त्याच्या औदार्याची सरासरी सांगतात. संपत्तीच्या विनियोगाचे सोज्वळ मार्ग सुचविण्याची चढाओढ वर्तमानपत्रांतून लावली होती त्या दानशूरानें. आईसारख्या दिसणाऱ्या एका महिलेचें घरदार सावकाराकडे गहाण पडलें होतें तें त्यानें कर्ज वारून सोडवून दिलें तिचें तिला–केवळ ती आपल्या आईसारखी दिसत असे म्हणून! अनेक लक्षाधीशांचा निर्माता म्हणून त्याचा लौकिक गाजून राहिला. धनाढ्यांनीं 'कुणाला गुरु करावा' असें मला विचारलें तर मी त्या कुबेराकडे बोट करीन.

लक्ष्मी राबवणें हें मी ऐश्वर्य समजतों. माझी उधळपट्टी कदाचित माझ्या अयशस्वी संचय–धोरणाची प्रतिक्रियाही असेल. मागें, मी प्रयत्न करून पाहिला,– वर्षाकांठीं कांहीं शिल्लक राहावी म्हणून वर्षभर मन मारून पाहिलें. पण तशा कृपण वागणुकीनें पडलेली शिल्लक इतकी क्षुल्लक ठरली कीं तिच्या मानानें मनाची वर्षभर केलेली उपासमारच जबर महाग आणि निष्ठुर वाटली. सतत मन मारून पैसा सांठविण्यापेक्षां आद्याच्या मर्यादेंत मनाचें कोड पुरविणेंच सुखावह होय, असें मला वाटूं लागलें. पैसा खर्च करणें हें व्यसन असलें तरी पैसा साठवणें हेंही व्यसनच आहे,– आणि तेंही उपभोगशून्य व्यसन आहे, निरर्थक वेड आहे ! जो पैसा आपण शिल्लक टाकतो तो आपला समजणें चूक आहे. आपण खर्च करतों तो पैसा

आपला. सांठवलेल्या पैशावर नजर ठेवून, आपल्या कलानें वागणाऱ्या कुटुंबियांपेक्षां, आपल्या खर्चिकपणाच्या वाहत्या गंगेंत डुंबून संतोष पावणारे कुटुंबीय – त्या संतोषानें आपला शद्व झेलण्यास राजी असणारे कुटुंबीय, हेंच खरें ऐश्वर्य. माझ्या घरांत त्या आमच्या शेजाऱ्यांचीं मुल अष्टौप्रहर रमतात, ह्याचं कारण तरी माझा खर्चिकपणाच. त्यांच्या घरांतल्या शुकशुकाटापेक्षां, माझ्या खर्चिकपणामुळें माझ्या घरांत जें साधनसामुग्रीचें वैपुल्य नांदत आहे आणि येणाऱ्या–जाणाऱ्यांच्या हासण्या–खिदळण्यामुळें जी वसंतोत्सवाची प्रफुल्लता बहरत आहे त्यांचाच त्यांना खाऊपेक्षांही लोभ वाटतो. सारांश, लक्ष्मी राबविणें हें मी ऐश्वर्य समजतों. आणि हें ऐश्वर्य असें कीं, गडगंज बँक–बुकासारखा कुणालाही हेवा वाटायला नको ह्याचा !

मग, शेजाऱ्यांची ही तक्रार का ? ही टीका का ?

विचारा–अन्तीं मला आतां कळून येत आहे कीं ती तक्रार नव्हती, ती टीका नव्हती. आमच्या प्रपंचांतील सढळपणामुळें त्यांचा काटकसरीपणा अप्रत्यक्षपणें उठून दिसला आणि पर्यायानें [ म्हणजे आमचा हेतू नसतांना देखील ] तो हिणवला गेला. त्यांची ती टीका म्हणजे दुखावल्या गेलेल्या अहंकाराच्या वेदना होत; एरव्ही त्यांनीं हेवाच केला असता माझ्या ऐश्वर्याचा. पण हिणवला गेलेला मनुष्य, दुखावला गेलेला अहंकार हेव्याची प्रांजळ भाषा न वापरतां टीकेची भाषा वापरतो. नाही तर काय ?

त्यांची भूमिका प्रेक्षकाची किंवा परीक्षकाची नव्हती; उमेदवाराची होती–माझ्याच पंगतीला बसलेल्या उमेदवाराची होती. माझ्या चित्राइतकें त्यांचें चित्र उठून दिसेना आणि तितकें उठावदार काढण्याचें जमेना. माझा शेजार त्यांना कसा सहन व्हावा ? तेव्हां, त्यांनीं माझें चित्रच चिताड करण्याचा कावा केला. आपली उंची वाढत नाहीं म्हणून दुसऱ्याचे पाय कापायचे हा न्याय त्यांना युक्त वाटला. बहुतेक निंदा-नालस्ती अशा मनोवृत्तींतून निर्माण होत असते.

**अरेरे, अशी टीका करून आपल्या भिकारकरटेपणाची आपण कबूलीच देत आहोंत हें कसें कळत नाहीं ह्यांना ? कां, मोहरांचे रांजण तळघरांत असूनही आपण दरिद्री आहोंत हें सरळ सांगायची फक्त शरम वाटते !**

---

## "करुं जग शोभावन्त" : १९

साहित्य नि कला ह्यांचा जीवनाशीं सम्बन्ध काय, असा प्रश्न जेव्हां चर्चिला जातो तेव्हां एक संस्कृत सुभाषित आठवतें. तें म्हणजे "साहित्य-सङ्गीत-कलाविहीनः। साक्षात् पशुः पुच्छविषाणहीनः" हें होय. मनुष्याचें मनुष्यत्वच ह्या उक्तींत सांगितलेलें आहे. तें जर मान्य केलें तर मनुष्यमात्राच्या जीवनाशीं साहित्य नि कला ह्यांचा सम्बन्ध काय असावा ह्याबद्दल तादृश वाद उरत नाहीं; उरलाच तर तो केवळ तपशीला-पुरता उरेल आणि तपशिलाबाबत ऐकमत्य प्रस्थापित होण्याची कांहीं आवश्य-कता नाहीं. कारण तो तपशील वैयक्तिक अभिरुचीवरच अवलंबून राहणार.

ज्या जगांत आपण 'मनुष्य' म्हणून जन्माला आलों आणि जें जीवन आपण व्यतीत करणार तें जग व जीवन अधिकांत अधिक सुन्दर करण्यासाठीं साहित्य-संगीत-कला यांची कास धरावयाची, एव्हढा निष्कर्ष ह्या सर्व वादांतून निघायला हरकत नाहीं. सर्वांनीं जर कोणतें एकच व्रत पत्करायचें असेल तर तें 'करुं जग शोभावन्त' हें होय.

आणि प्रत्येक व्रताप्रमाणें ह्याहि व्रताचा अंगिकार प्रत्येकानें स्वतः पासूनच करायला हवा. 'करुं जग शोभावंत,' असें घोकणारानें आपलें वैयक्तिक सौन्दर्य वाढविण्याची प्रथम दक्षता घेतली पाहिजे. अर्थातच सकृद्दर्शनीं हें म्हणणें कांहीं जणांना अगदी किरकोळ स्वरूपाचें, उथळपणाचें वाटेल. पण आपण आपलें बालपण आठवा. शाळेंत डेप्युटी यायच्या दिवशीं मास्तरांनीं आपणांस सुन्दर पोषाख करून यायला सांगितलेलें असेल. बालपणीं जें योग्य दिसलें तें प्रौढपणीं दिसत नाहीं असा प्रौढांचा रूढ दंडक आहे. एकीकडे आपल्या चिमुकल्याला न्हाऊं घालून सजवीत असलेली माउली आपला थोरला मुलगा आरशांत पाहून भांग पाडतो आहे असें पाहतांच त्याला मात्र हिडिसफिडिस करते, त्याचा पाणउतारा करते. आणि थोरांचीं तर साधेपणाच्या नांवाखालीं गबाळेपणा करण्यापर्यंत मजल जाते. पण गबाळेपणा तर नकोच नको आणि साधेपणासुद्धां आकर्षक, पाह-णाऱ्याच्या मनांत अनुकल ग्रह उत्पन्न करण्याइतका प्रभावी पाहिजे. आणि

असला प्रभावी साधेपणा सौन्दर्य–संगोपनाचाच आविष्कार होय.

वैयक्तिक सौन्दर्य आहे तें खरें, वाढवून कां तें वाढत असतें अशा भावनेनें, आपण कुरूप व्यक्तीनें केलेला नट्टापट्टा पाहून नाक मुरडतों. शामलेनें आपली कांति प्रसाधनानें उजळ केली तर ती लोकांच्या कुचेष्टेला कारण होते. आपले जातीचे आहे हे खरें; उसनवारीचें वैभव कशाला ? असा वरकरणीं उदात्त पण तितकाच नैराश्यजन्य आणि म्हणून तितकाच विरक्तीचा विचार ह्या चेष्टेच्या मुळाशीं असतो; पण, असलेल्या वैगुण्याला शक्य तितकें सजवून वावरणाऱ्या ह्या व्यक्तींचे आपण खरोखरी आभार मानले पाहिजेत. कारण, ह्या सजावटीच्या मुळाशीं [ केवळ आत्मपूजेची हाव नसून ] सद्हेतूही नाहीं कां ? उग्र दर्प असलेले पदार्थ खाऊन चार लोकांत जाण्याची पाळी येतांच आपण वेलचीसारखी स्वादिष्ट मुखशुद्धि चघळत बाहेर पडत नाहीं कां ? तें जितकें योग्य तितकेंच नीटनेटकी वेषभूषा करून बाहेर पडणेंही योग्यच आहे. कारण, सर्वांचीच नजर सौन्दर्यासाठीं आसावलेली असते. त्या सौन्दर्यशोधक नजरेची भूक भागविणें हे प्रत्येक समाजघटकाचें ध्येय व्हायला काय हरकत आहे ?

थोरांना सौंदर्याचा हव्यास नसतो, असें नाहीं.

पुजाऱ्यालाही आपल्या देवमूर्तीची सुंदर पूजा बांधायची हौस असते, आणि—

नेणत्या बालकाचीही सुंदर वस्तूंकडे धांव असते. एक लहानसा घरगुती दाखला देतो [ आणि तुमच्या–माझ्यांत तसा कांहीं निराळेपणा नसल्यामुळें तुम्हांला पटेलही. ] माझी कन्या ३–४ वर्षांची असतां वेळची गोष्ट. माझाच तिला लळा फार. तिची सर्व कांहीं उस्तवारी मी करावी असा तिचा बालहट्ट. इतका तिचा माझ्याकडे ओढा. पण माझ्या जर अंगांत कांहीं कपडा नसला तर ती मला अचूक सांगे कीं आधीं अंगांत घाल ! सदरा न घालतां मी तिच्यापुढें गेलों तर तिला तें खपत नसे. अंगांत घालूनच तिच्यापुढें जावें लागे. ऑफिसांतहि सुखसोयीसाठीं कोट–टोपी काढून वरिष्ठापुढें जाण्याचें धारिष्ट मी करूं शके. पण सदरा न घालतां घरांत मी माझ्या चिमुकल्या कन्येपुढें जाऊं शकत नसे. कारण तिच्या बालदृष्टींतील

सौंदर्याभिलाषेला तें रुचत नसे. हीच सौंदर्याभिरुचि थोरांच्याही मनांत असते. पण ते संकोचानें सांगू शकत नसतील ! तथापि पुराणकालीन वाङमयांतल्या एका प्रौढ प्रणयिनीच्या दाखल्यानें ही सौंदर्यदृष्टी स्पष्ट करतां येईल. पुरूरव्याचा स्वीकार ऊर्वशीनें ज्या कांहीं अटींवर केला, त्यांत तिची एक अट अशी होती कीं पुरूरव्याचें विवस्त्रदर्शन कधींही घडतां कामा नये; तसें तें घडतांच ती त्याचा त्याग करून जाईल. ह्या दोन्ही दाखल्यां-वरून एव्हढा निष्कर्ष निघेल कीं वस्त्राभरणांनीं व्यक्तिमात्राला शोभा येते आणि त्या शोभेची, त्या दर्शनी सौंदर्याची प्रत्येकजण दुसऱ्याकडून अपेक्षा करतो. आपण चांगलें दिसावें ही प्रत्येकाची इच्छा असते. वस्त्राभरणाचें प्रयोजन हें कीं, आपण निसर्गतः जसें आहों त्यापेक्षां अधिक छाप पडण्या-सारखें दिसावें; आणि म्हणून सुरूपापासून कुरूपापर्यंत सर्वजण आरशाशीं इतका एकान्त करीत असतात. प्रत्येक जण स्वतःला मदनाचा (वा रतीचा) अवतार समजत असतो; पण कांहींजणांना दुसऱ्याचा नट्टापट्टा, जामानिमा पाहून उगीचच कुचेष्टेनें नाक मुरडण्याची संवय असते. अशा तऱ्हेनें नाक मुरडणें म्हणजे निव्वळ कृतघ्नपणा आहे, समजुतींचा अभाव आहे. नट्टापट्टा करणारे इतरांची फसवणुक करतात असा त्यांच्यावर अनुच्चारित आरोप करण्यापेक्षां, आपलें जें वैगुण्य आहे त्याची एक प्रकारें अप्रत्यक्षपणें कबुली देऊन, तें शक्य तों इतरांच्या नजरेला न पाडण्याची ते प्रामाणिकपणें दक्षता घेतात, असाच आपण विचार बाळगला पाहिजे.

The physical aspect in love and friendship is so important that it is stupid to infer that a man who makes the best of himself is encouraged in his fancy by the devil.

वस्त्राभरणाच्या हौसेमोटीं कांहीं धूळफेकीचा डाव आहे, कांहीं चेटूक आहे, असेंच मानण्याचें कारण नाहीं.

" करुं जग शोभावन्त " ह्या व्रताच्या अंगीकारांतील ही प्राथमिक पायरी झाली. आणि ही प्राथमिक पायरी म्हणजे एकप्रकारें आत्म-

पूजाच असली तरी सौंदर्यसंगोपक–नजरेनें आत्मपूजा करण्यांत कांहींच वावगें नाहीं. ह्या आत्मपूजेचा बाणा हळूहळू अंतरंगीं बाणूं लागला कीं त्यांतून दुसऱ्या पायरीवर जाण्याची आपोआपच ओढ लागेल. दुसऱ्याकरितां आपलें शरीर सजवायचें आहे ही भावना आणि बाजारी वृत्ति ह्यांतील भेद अगम्य नाहीं. ती भावना उत्पन्न झाली म्हणजे ज्या दुसऱ्याच्या सहानुभूतीची चाड आपल्याला असेल त्याच्या अभिरुचीप्रमाणें आपण आपलें शरीर शुद्ध राखण्यासाठीं आपोआप झटूं लागूं. प्रेमिकांची मनोभावना तपासून पहा. प्रेमिकांचें अत्युच्च आत्यंतिक समाधान आत्मदान करण्यांत असतें. आणि आत्मदान म्हणजे नैवेद्य होय. आत्मदान म्हणजे भिक्षा नव्हे. उष्टे–माष्टें, शिळें–पाके, उघडें–वाघडें पडलेलें अन्न आपण भिकाऱ्याला देतों. पण माय आपल्या मुलाला खाऊं घालतें, भरवतें, तें अन्न निर्मळ नि ताजें असावें, इतकेंच काय पण कुणाचीही आशाळभूत नजर त्यावर गेलेली नसावी, असा तिचा कटाक्ष असतो. तोच भाव प्रेमळ गृहिणीचाहि असतो. आणि खऱ्या प्रेमिकाला आत्मदान अगदीं विशुद्ध स्वरूपांत करण्याची तळमळ असते. हुंगलेलें अन्न देवाच्या नैवेद्याला चालत नाहीं. त्याच भावनेनें प्रेमिक हा आत्मदान करूं इच्छितो. तसें आत्मदान करण्यांतच त्याचें जीवित-साफल्य सामावलेलें असतें. आत्मपूजेंतून शरीराची अशी विशुद्धता राखण्या-कडे, प्रतिष्ठा ठेवण्याकडे प्रवृत्ति होणें ही सौदर्यसंगोपनाची पुढची पायरी होय. आपलें उसनवारीचें वैभव, जरी वरकरणी प्रसन्नतेचें वातावरण निर्माण करण्यापुरतें पुरेसें असलें, तरी पण तें शेवटीं दगा देणारें आहे; ही जाणीव एकदां झाली कीं, अधिक टिकाऊ सौन्दर्य–साधनेकडे लक्ष जाईलच जाईल. वेलची खाऊन तोंडांतली दुर्गंधि लपविली जाते खरी, पण मग ती लपविण्या-पेक्षां तिचें मुळांतच निराकरण करण्याकडे प्रवृत्ति होईल. अभक्ष्य भक्षण करून त्याच्या निरसनार्थ उपरी उपाय करण्यापेक्षां तें अभक्ष्य भक्षण टाळण्या-कडेच खऱ्या सौन्दर्यसंगोपकाची प्रवृत्ति होईल. ढोंग उपहासास्पद वाटण्याची भीति वाटूं लागली कीं, तें झुगारून देण्याची आंच लागेल. शरीरावरची जखम वाईट दिसते, किळसवाणी असते, म्हणून आपण ती झाकून नीट सज-वून ठेवतो; पण त्याहिपेक्षां ती होऊंच नये, म्हणजे ती सजविण्याची दक्षता

घेण्याचीच पाळी नको, असें नाहीं कां आपणांस वाटत ? त्याचप्रमाणें आपलें शरीर हें जर दुसऱ्याच्या सुखासमाधानाची देखील एक वस्तु आहे आणि त्या दुसऱ्याची जर आपणास मनापासून चाड आहे तर आपणांकडून तें शरीर बाह्योपचारांनीं शृंगारण्याबरोबरच अंतरंगानेंहि निर्लेप, निरामय, आणि निष्कलंक राखण्याचा प्रयत्न होऊं लागेल. शरिरावर आपली माया असते, शरीर दुखावलें जाऊं नये अशी आपण काळजी घेतो. पण ह्या मायेच्या पोटीं, ह्या इच्छेच्या कक्षेंत केव्हढा व्याप असतो, केव्हढी दक्षता घ्यायची असते ह्याची आपणांस नीटशी कल्पना येत नाहीं. बाह्य प्रसाधनें हीं झाडांच्या पानांप्रमाणें कालान्तरानें मलूल होऊन गळून पडणारीं असतात; तेव्हां खरें सौंदर्य तेंच कीं जें गळून पडणार नाही. गळून न पडणारें, आटून न जाणारें सौंदर्य अर्थातच आन्तरिक असणार. उपसा होत राहिला कीं हौदांतलें पाणी आटून जातें. कारण तें वरून येत असतें; पण विहिरीत पाण्याचा जिवंत झराच असला म्हणजे उपशाची भीति कशाला ? वर म्हटल्याप्रमाणें आपण मदनाचे पुतळे आहोंत, आपण मोहक आहोंत असा पुष्कळांचा समज असतो आणि मदन वा रति हीं अतिशयोक्तीचीं परिमाणें सोडून दिलीं तरी, कांहीशी मोहकता कांहीं काळ-पर्यंत पुष्कळांचे ठिकाणी असतेही. " कांहीं काळपर्यंत " असें म्हणण्याचें कारण हेंच कीं ती मोहकता, तारुण्य व आरोग्य ह्यांची झिलई असते; वेषभूषेची तकाकी असते; सोळाव्या वर्षाच्या उंबऱ्याशेजारचा तो फुलोरा होय. पण वयाच्या माध्यान्हीनंतरहि जर आपण मोहक आहोंत असा लोकांनी अभिप्राय व्यक्त केला तर खरोखरीच तशी रास्त समजूत करून घ्यायला नि अभिमान बाळगायला हरकत नाहीं. कारण वयाच्या उतरणी-वरही जी प्रसन्नता, जी आकर्षकता ( Charm ) टिकून राहते ती शरिराची नसून मनाची असते. पार्थिव आकर्षकता म्हणजे यौवनाचा विलास. आणि तो मनुष्यमात्राच्याच तेवढा वाट्याला आलेला असतो असें नव्हे, तर पशुपक्षांतहि आढळतो. पण खरी मोहकता, वयाच्या उतरत्या काळींही टिकून राहणारी मोहकता मनाची,–सदाचाराची व सद्गुणाची शोभा होय. आणि तींतच मनुष्याचें मोठेपण आहे. खऱ्या सौंदर्यसंगोपक:

दृष्टीला, "करुं जग शोभावन्त" ह्या व्रताचा अंगीकार करणाराच्या नजरेला, स्वतःचें सौंदर्यसंगोपन आपल्या परिघांत येणाऱ्या प्रत्येकाच्या सुखा-समाधानाच्या वृद्धीसाठीं आवश्यक आहे हें पटल्याबरोबर तो आपोआपच आत्मिक सौन्दर्य संपादण्याकडे वळेल.

शरीर हें देवळाप्रमाणें राखलें पाहिजे, शरीर हें दुकानदाराची शो–केस नव्हे. हाच ह्या आत्मपूजेचा अर्थ. देवळाचा दुरुपयोग होऊं नये, देवळाची चावडी किंवा धर्मशाळा होऊं नये ही जशी खऱ्या पुजाऱ्याची भावना असते, तद्वतच शरिराची अप्रतिष्ठा होऊं नये, शरिराची पायमल्ली होऊं नये, विटंबना होऊं नये हें खऱ्या सौदर्यसंगोपकाला उमगेलच उमगेल. "करुं जग शोभावन्त" ह्या व्रताचा वैयक्तिक आविष्कार काय हें येवढ्या-वरून ध्यानीं येईल आणि आत्मपूजाही आवश्यक वाटेल.

ह्या व्रताचा अधिक लौकिक आविष्कार तपशीलवार सांगायला पाहिजे असें नाहीं. जग हे निसर्गतःच जसें सुन्दर आहे तसेंच तें कांटचा-कुटचांनीं खचलेलें आहे. पाणी जसें निसर्गतः सुनील–निर्मल आहे तसेंच तें शेवालानें युक्तहि आहे तेव्हां कांटेकुटे नाहीसे करणें, शेवाल बाजूला सारणें, घाण नाहींशी करणें हें ह्याच व्रताच्या पोटीं आहे. आपल्या तुट-पुंज्या साहित्यानें आणि कलाकुसरीनें आपलें घर शृंगारावें हें काय कुणाला सांगावें लागतें ? तसेंच, समाजांतील घाण काढून टाकण्याचें काम करायला हवें. घरांत वावरतांना वाटेंत पडलेली वस्तु घरधनी, किंबहुना कुटुम्बां-तील जबाबदार घटक उचलून बाजूला ठेवतो. त्याचप्रमाणें घराबाहेरच्या समाजांतहि घृणा उत्पन्न होईल अशी जी आचारविचाराची अडगळ आढळेल तिचा निरास करणें समाजांतील प्रत्येक व्यक्तीचें उद्दिष्ट व्हायला हवें. नगरपालिका शहर-सौन्दर्यासाठीं झाडूवाल्यांना नोकरीला ठेवते आणि झाडू-वाल्या पोटासाठीं कां होईना, पण शहरसौन्दर्याला हातभार लावीत असतात. चालीरीतींत साठलेली घाण नाहींशी करून सामाजिक जीवनाला निरामयता आणण्यासाठीं असे पगारी पोटार्थी झाडूवाले किती उपयोगीं पडणार ? त्याकरितां सौंदर्याभिवृद्धीची पोटतिडीक असलेले त्रयस्थ लोकच हवेत आणि अशा त्रयस्थ लोकांचें प्रभावी व्यक्तिमत्त्व म्हणजे सौन्दर्याविष्कारच होय.

शरद्ऋतूंतील काळ्या-सावळ्या मेघांनाही मनोहर रंगांनीं मढवून टाकण्याचें सामर्थ्य अस्तोदयींच्या सूर्यकिरणांत असतें. मेघांवरील तो रंग-विलास पाहून कुणासही असें वाटणार नाहीं का कीं, व्यक्तिमत्त्व असावें तर ह्या सूर्यासारखें प्रभावसंपन्न असावें, कीं जेणेंकरून आसमंतांतील खिन्न वा निराश प्राणिमात्रांच्या जीवनांत रंगविलास उत्पन्न व्हावा ! अर्थात् त्या-बरोबरच सूर्याची प्रखरताहि सहन करावी लागणारच. प्रभावी व्यक्तिमत्त्व लोकविलक्षण असल्यास नवल काय ? आणि त्या लोकविलक्षणाबद्दल राग-द्वेष व्यक्त करणें चूक नव्हे काय ? रस्ते झाडणाऱ्या महारणीनें केरकचरा जाळला तर ती तिची जाळपोळ आणि तीतून निघणारा धूर क्षम्य होत नाहीं का ? तीच क्षमाशील दृष्टि, तसलीच सहनशीलता ह्या लोकविलक्षण प्रखर सौंदर्यसंगोपकांच्या बाबतींत आपण धरायला हवी. प्रजेच्या अभ्युदयासाठीं, मानव्याच्या प्रस्थापनेसाठीं चक्रवर्तीची युद्धप्रवृत्ति किंवा लोकनायकाचा परा-कोटीचा अहिंसावाद ह्या दृष्टीनें सह्य झाला पाहिजे. कारण त्यांतून वीरवृत्तीची जोपासना होणार आहे, सौंदर्याचा गाभा उफाळून येणार आहे, शुद्ध सीता प्रगट होणार आहे. ध्येय जितकें उज्ज्वल तितकींच भूषणेंही भिन्न होतात. युद्धांत झेललेले प्रहार हींच योद्धयाचीं भूषणें ठरतात; आणि दरिद्रीनारायणाचा इतमाम अवघ्या पंचापुरताच उरतो

व्यक्तीपासून समष्टीपर्यंतचें सौदर्यसंगोपन हें होय ! साहित्य नि कला ह्यांना मानवीं जीवनांत ह्याच दृष्टीनें स्थान आहे. व्यक्तिमात्रापुरता सुटसुटीत संदेश देणें म्हणजे 'करूं जग शोभावन्त' ह्या व्रताची दीक्षा देणें होय. ह्या सर्व उहापोहाचें सहज आकलन होण्यासारखें सार एका इंग्रजी पद्यपंक्तींत सांगतां येईल. ही पद्यपंक्ति सर्व स्पॅनिश मुलांना शिकविण्यांत येणाऱ्या एका कव्युवर्तीचा अनुवाद आहे--

If any little word of mine
May make some life the brighter;
If any little song of mine
May make one heart the lighter
God, help me speak that little word

God, help me sing that lay,
So may some sad and lonely heart
More bravely face each day.※

जीवितयात्रेंतील प्रत्येक पाऊल ह्या जाणीवेनें पडलें तर ?

" करुं जग शोभावन्त. " हा माझ्या एका कवनांतील चरण आहे. नदीचा जीवनक्रम वर्णन करतांना मी—

मरुभुमीतुन, दहनभूमितुन । गात चालली एकच गायन--
" करुं जग शोभावन्त " ॥

हें तिचें उद्दिष्ट कल्पिलें आहे. सर्व मानवी व्यवहारांना ह्या एकाच उद्दिष्टानें संजीवनी मिळत गेली तर ?--

---

※ स्थूल अनुवाद:—

माझ्या एकाद्या किरकोळ शब्दानेंही
जर कोणाच्या जीविताला उजळा मिळायचा असेल,
माझ्या एकाद्या कवनानें
जर कोणाच्या अंत:करणावरचा भार हलका व्हायचा असेल
तर, देवा, तो शब्द उच्चारण्याची मला बुद्धि दे
देवा, ती लकेर घेण्याची मला स्फूर्ति दे
कीं तेंणें करून, कोणी कष्टी व एकाकी जीव
प्रत्येक येत्या दिवसाला वाढत्या धैर्यानें तोंड देऊं शकेल..

[ अहमदनगर येथील कलामण्डळाच्या सातव्या सम्मेलनप्रसंगीं ता. २८ सप्टेंबर १९४० रोजीं केलेल्या अध्यक्षीय भाषणांतून. ]

---

‘ कांतणीचे घरा ’ ची

# वास्तुशांत

[ वाङ्मय – प्रकाराचें किंचित् विवेचन ]

ह्या माझा ललित निबंधांचा संग्रह—हो, ललित कीं लघु ! नामकरणाबद्दल बरीच भवति–न–भवति झाली आहे आजवर. नांव ठेवण्याकडे सगळ्यांचाच ओढा असतो. आणि प्रत्येकाला स्वमताला पोषक तेव्हढा पुरावा सांपडतोही. पण मुक्तक व भावगीत, स्वनितक व सुनीत ह्या संज्ञांप्रमाणेंच, ललित निबंध काय किंवा लघु निबंध काय, ह्या दोन्ही संज्ञा सर्व लक्षणांचा बोध होण्याइतक्या अन्वर्थक नाहींत. लघुत्व हें ह्या वाङ्मयप्रकाराचें गमक आहे, नुसतें एक गमक नव्हे तर ठळक गमक आहे, असें ‘ लघुनिबंध ’ ह्या संज्ञेवरून वाटावें ! पण खरोखरी, लघुत्वा-वर तसा भर मुळींच नाहीं. त्यांतल्या त्यांत ‘ ललित निबंध ’ हेंच नांव, लक्षणांचा विचार करतां, जरा जवळचें आहे. पण लघुत्वाच्या बाह्य लक्षणावर मुळींच भर नसूनही ती संज्ञा स्वीकारणारे वाङ्मय-समीक्षक ‘ ललित निबंध ’ ह्या आन्तर गुणनिदर्शक संज्ञेला अति-व्याप्तीच्या दोषानें वाळीत टाकतात ! आत्मनिष्ठ आणि अनात्म-निष्ठ असे जे ह्या निबंधाचे दोन भाग, त्यांपैकीं आत्मनिष्ट निबंधाला लालित्य वावडें नाहीं,– इतकेंच नव्हे तर लेखकाच्या व्यक्तिमत्त्वांतून फुललेला निबंध लालित्यविहीन असणारच नाहीं. पण, ह्या

वाङ्मयप्रकारांत आग्रहीपणाला अवसर नाहीं असें एकीकडे सांगताना, स्वयंपुरस्कृत संज्ञेबद्दल जो तो आग्रह धरतो ! तथापि, एकदां एकादी संज्ञा रूढ झाली म्हणजे मग तिच्याबद्दल चोखंदळपणानें खळखळ घालण्यांत हांशील नाहीं. नाहीं तरी, संज्ञा मुळांत ज्या कल्पनेनें अंगिकारण्यांत येते त्या कल्पनेपुरताच तिचा संसार कुठें मर्यादित राहतो ? ज्या कोणी "कादंबरी" ही संज्ञा प्रथम पुरस्कारून रूढ केली, त्याच्या कल्पनेशीं आज 'कादंबरी' ह्या नामाभिधानानें मिरविणाऱ्या कथा–वाङ्मयांतील सर्व प्रकारच्या रंग-रूपांचा आणि तंत्रपद्धतींचा मेळ बसेल कां ? मला तरी जबर शंका आहे. पण ती संज्ञा आज सर्व–संग्राहक होऊन बसलीच आहे कीं नाहीं ? 'लघुनिबंध' ह्या संज्ञेभोंवतींही असेंच कल्पनावलय, चंद्रासभोंवतीं पडणाऱ्या खळ्याप्रमाणें, जमत आहे—जमेल.

हा माझा लिखाण–संग्रह कोणत्या वाङ्मयप्रकारांत समाविष्ट होईल ? माझी समजूत (वरील परिच्छेदाच्या पहिल्याच वाक्यांत अभावित-पणें प्रगट होऊन राहिल्याप्रमाणें) अशी आहे कीं, ज्याला आज मराठींत लघुनिबंध ( किंवा ललित निबंध) म्हणतात त्याच प्रकारांत ह्याची गणना होईल. ह्या प्रकारासंबंधीं नवीन कांहीं सांगायला पाहिजे असें वाटत नाहीं. इंग्रजींत ह्या वाङ्मय–प्रकाराचा अनेकांनीं उहापोह केला आहे. आणि, इंग्रजीच्याच अध्ययनानें हा प्रकार मराठी साहित्तिकांना अवगत झाला असल्यामुळें, 'गुजगोष्टी' पासून 'उघड्या लिफाफ्या' पर्यंत [ गिरीश आणि परब यांच्या हातभारासहित ] त्या मूळ उहापोहाच्या अनुरोधानें मराठींतही पुष्कळ चर्चा झाली आहे. अर्थात्, तिचा लघुतम–साधारण–विभाज्य काढला म्हणजे ह्या वाङ्मय-

प्रकाराचीं सर्व लक्षणें अभ्यासकाच्या पदरांत पडतील. स्वत: मला काय बोध झाला आहे तो पहिल्याच निबंधावरून समजून येण्यासारखा असल्यामुळें इथें त्याचा पुनरुच्चार अनवश्यक होय.

तथापि, थोडी पुस्ती जोडायची म्हटल्यास जोडतां येईल. माझीं 'प्रापंचिक पत्रें' वाचून एका वाङ्मय-समीक्षकाला त्या लेखनांत लघुनिबंधलेखकाची ढब दिसली [ हाही उल्लेख पहिल्या निबंधांत आला आहेच ]. असें नमूद करतांना त्याला काय सुचवायचें होतें? दोष दाखवायचा होता असें धरून चाललें तरी, मी असेंही म्हणूं शकतों कीं, तें त्यानें अचुक निदानच केलें. कारण, 'पत्र-लेखन' हें लघु-निबंधाचें भावंडच आहे. – नव्हे, दोन्ही प्रकार पुष्कळ-अंशीं एकरूप आहेत. इंग्रजी लघु-निबंधांचें उदण्ड परिशीलन करणाऱ्या वाचकाला सहज आढळेल कीं कांहीं लघु-निबंध पत्र–रूपच आहेत. कारण, पत्रांतला जिव्हाळा हा लघु-निबंधाचा एक ठळक गुणच आहे.

पत्रांतली जवळीक, गप्पांतला पायघोळपणा आणि कांहींसें विषयान्तर, स्वमत-समर्थनासाठीं माफक वकिली, सत्य व सत्याभास आणि त्याकडे जाण्याची आडवळणी पण स्वतांच्या पायाखालची वाट, इत्यादि गुणविशेषांचा ह्या लेखन–प्रकारांत समावेश होतो.

'माफक वकिली' हें लक्षण देण्याचें कारण असें कीं, कोणी एका समीक्षकानें आग्रहीपणा वर्ज्य मानला आहे ह्या वाङ्मय–प्रकारांत. बाकी, माझें असें मत आहे कीं प्रत्येक लेखक हा वकिलीच करीत असतो. कांहींच प्रस्थापित करावयाचें नसल्यास, कशाचाच पुरस्कार करावयाचा नसल्यास, लेखणी उचलायची तसदी कोण घेईल? मनोरंजन झालें तरी त्याचे पाय कुठें तरी लेखकाच्या

वैयक्तिक मताला टेकलेले असतात आणि कल्पना-विलास झाला तरी त्यांतूनही त्याच्या मताचा सूक्ष्म धागा गेलेला असतो. मग, आग्रही-पणा नको म्हणण्यांत काय महत्त्व आहे? जें सुख, जें दुःख, जें उद्बोधन, जी अनुभूति लेखकाच्या मनाला चाटून जाते तें तें सारें दुसऱ्याला पटविण्यासाठीं जर लेखन-प्रवृत्त व्हायचें तर त्यांत तोकडे-पणा किंवा कसूर काय उपयोगीं? आग्रहीपणा यायचाच आणि तो खुशाल असूं दे. तो जितका आत्यंतिक असेल तितका वेधक ठरेल. गुळमुळितपणासारखा दुर्गुण नाहीं. तेव्हां, म्हणायचेंच झालें तर, ' रुक्ष ' आग्रहीपणा नको असें म्हणावें.

आणि ' रुक्षपणा नको ' ह्याचाच अर्थ लालित्य हवें, गोष्टी-वेल्हाळपणा हवा, कोटिबाजपणा हवा, खुसखुशीत विनोद हवा.

लग्नपत्रिकेवर ज्याप्रमाणें कुंकवाचा शिडकाव हवा, त्याप्रमाणें लघु-निबंधांत विनोद हवा, असें जो तो तंत्रप्रस्थापक सांगत आहे. आधीं लेखन-प्रकार आणि मागाहून त्याचें शास्त्र, असा क्रम असल्यामुळें, ' विनोद हवा ' हें तंत्रकारांचें म्हणणें ओघानेंच आलें आहे. कारण, निबंध-लेखकांना मिळालेलीं प्रशस्ति-पत्रेंच तशीं आहेत. " मनोरंजन करणारा, कधींही कंटाळवाणा न वाटणारा, निबंधकार ! त्याच्या लेखणींतून विनोदाचे – कोटीचे – बुडबुडे फुलत आहेतसे वाटतात. " हें मिल्ने ( A. A. MILNE ) ह्याला मिळालेलें एक प्रशस्ति-पत्र आहे. दुसऱ्यानें त्याचें कौतुक करतांना " गर्भरेशमी कापडाप्रमाणें, विनोदाचे धागे-दोरे ह्या निबंधांच्या अंगांतून खेळत आहेत " असे उद्गार काढले आहेत. अँड्र्यू लँगबद्दल लिहितांना असें म्हटलें गेलें आहे कीं, ALL that

he says is punctuated with a delicious humour and sound commonsense. ह्या किंवा ह्यांसारख्या अनेक लघु-निबंधकारांना मिळालेल्या असल्या अभि-प्रायांचा आशय एवढाच कीं तो तो गुण त्या त्या लेखकांत होता; आणि तो त्यांच्या लेखनांत दिसून आला. म्हणून, आज ह्या लेखन-प्रकाराचाच तो एक लक्षणविशेष म्हणून सांगण्यांत येत आहे. पण ध्यानांत घ्यायला हवें तें हें कीं कोणताही गुण हा व्यक्तीचा असतो आणि वाङ्मयप्रकार त्या व्यक्तीच्या पिण्डप्रकृतींतून फुलून आलेला असतो, – यावा लागतो.

विनोदाचे बुडबुडे ज्याची लेखणी प्रसवत नाहीं, असाही यशस्वी निबंधकार असूं शकेल; आहेही ! रिचर्ड किंग हें त्याचें नांव. जिव्हाळा आणि विशाल सहानुभूति हे त्याचे गुण. मानवी जीविताच्या हमरस्त्यावर किंवा पायवाटेवर उद्भवणाऱ्या अनेक प्रश्नोपप्रश्नांबाबत जिवलगाच्या जाणीवेनें आणि कनवाळूपणानें दिलासा देणारा लेखक, ह्या नात्यानें लक्षावधि वाचकांच्या अंतःकरणांत त्यानें प्रवेश केला आहे. हा जो त्याचा गौरव गायिला जातो त्यांत विनोदाचा उल्लेख केलेला दिसत नाहीं. तेव्हां, सर्वच लक्षणें सर्वच लेखकांत आढळणार नाहींत आणि एकाच लेखकाचे सर्व निबंध एकाच प्रकारचे असणार नाहींत. कारण प्रकार किंवा तंत्र ह्यांची खुलावट जशी लेखकाच्या व्यक्तिमत्त्वांतून होत असते तशीच ती विषयाच्याही अनुरोधानें होत असते. लेखकाच्या सर्वच्या सर्व गुणविशेषांना पेलून धरील – अवसर मिळेल – असा प्रत्येक विषय असत नाहीं. गोलंदाजानें फेकलेल्या चेंडूच्या गतीचें,

चालीचें व उंचीचें अवसान हेरूनच बॅट्स्‌मन टोला लगावतो. तो सर्वच टोले चौकाराचे मारूं शकत नाहीं आणि एकाच दिशेला धाडीत नाहीं.

विषयाच्या बाबतींत विविधता उमोप आहे. आपण केलेल्या एका अद्‌भुत व अचाट शिकारीचें वर्णन — कीं ज्यांत प्रांजळपणाच्या आवरणाखालीं शिकाऱ्यानें भरपूर थापाडेपणा, एक हात लाकूड तर सव्वा हात ढलपी असला थापाडेपणा व्यक्त केला आहे असें वर्णन असलेलें एक पत्र अँड्र्यू लँगनें लघुनिबंध म्हणून दिलेलें आहे. प्रवासवर्णनें हीं सी. ई. मॉंटेग्यूच्या लघुनिबंधांचे विषय झालेलीं दिसतात. चार्ल्‌स् राजाच्या चव्हाट्यावरील शिरच्छेदाचें चित्रण हिलेर बेलॉकनें लघुनिबंध म्हणून सादर केलें आहे. मनुष्यस्वभावांतील खतखोडी, दांभिकपणा ह्यांच्यावर ( सडेतोड टीका न करतां, खवचट उपरोधानें किंवा क्षमाशील समजुतदारपणानें ) उभारलेलें लिखाणही लघुनिबंध म्हणून पुढें करणें हा प्रघात तर सर्रास आहे.

इंग्रजींत लघुकथा आणि लघुनिबंध ह्यांनीं इतकीं स्वरूपें धारण करायला सुरुवात केली आहे कीं, ह्या दोघांच्या मधील बांध लवकरच स्पष्ट दिसेनासा होईल कीं काय अशी भीति वाटण्याइतकी ह्या उभयतांनीं आपली मर्यादा उल्लंघून दुसऱ्याच्या क्षेत्रावर आक्रमण चालविलेलें आहे. Two Apologues आणि The Cut-Glass Bowl हे ल्यूकस्‌चे दोन लघुनिबंध लघुकथेच्या बाजूलाच झुकलेले नाहींत कां, असा माझ्या मनाला प्रश्न पडतो. उलट, वुइल्यम सरोयान ह्या विख्यात लेखकाच्या लघुकथासंग्रहांतील कांहीं गोष्टींना लघुनिबंध म्हणण्याचा माझ्या मनाला मोह पडतो. ( माझ्या ह्या

विचक्षणेंतील अपांडितपणा मान्य करूनही मी म्हणूं इच्छितों कीं ) ह्या प्रकारद्वयांतील सरहद्द, आज तरी सरळ रेषेप्रमाणें नसून, भूशिरें आणि खाड्या असलेल्या किनाऱ्याप्रमाणें दिसत आहे.

लघुनिबंध इतर तर्कप्रधान शास्त्रीय निबंधाप्रमाणें मुद्दे काढून मांडलेला असत नाहीं. कुठें कुठें असें दिसून येतें कीं विषय अनुभूतींतून हातीं लागला असला तरी त्याची मांडणी आणि खुलावट निरानिराळ्या व्यक्तिबाह्य मुद्यांच्या अनुरोधानें केलेली असते. अर्थात् त्या लेखनांत कृत्रिमता येते; आणि कृत्रिमतेनें लघुनिबंधाला गौणपणा येतो — सरसतेला संक्षेप बसतो. लघुनिबंध म्हणजे व्यक्तिमनाचा आविष्कार. तो आविष्कार कधीं झुळुकेप्रमाणें होईल, तर कधीं कारंजाप्रमाणें होईल; कधीं पतंगाप्रमाणें होईल तर कधीं पुष्पविकासाप्रमाणें होईल. सारांश, त्यांत प्रस्फूर्तता हवी, तंत्राची अवधानता नको — तंत्र आपोआप तयार होईल.

ह्या संग्रहांतील बहुतेक ललित निबंध नवीन आहेत. 'नवीन' ह्याचा अर्थ ' पूर्वीं कुठेंही प्रसिद्ध न झालेले '. एरव्हीं अद्‌भुतपणावर हक्क सांगण्यासारखें नाविन्य ह्या संग्रहांत नाहीं, हें मी जाणतों. इतकेंच काय, पण, मराठी ललित निबंधाच्या प्रांगणांत आधींच उतरलेल्या साहित्तिकांच्या विषय — विचाराचा ह्या संग्रहांत कुठें कुठें प्रतिध्वनी निघत असल्याची कोणी व्यासंगी ग्वाही देखील देतील. [ आणि तेच तेव्हढे व्यस्त प्रमाणांत दाखवून देऊन, एकूण पुस्तकांत कांहींच नवीन नाहीं अशी वाचकांची दिशाभूल करण्याचें श्रेय सफाईनें साधण्याचा प्रयत्न करूं पाहतील ]. पण साम्य पोषाखांत किंवा तोंडावळ्यांत असलें तरी पिंडप्रकृतींत आहे कीं नाहीं हें

पहावयास हवें. आणि भिन्नता असते ती तिथेंच. नाविन्य असतें तें त्या भिन्नतेंत. एकाद्या विषयांतील निष्कर्षरूप सत्य कोणाच्याही लेखणींतून अवतरलें तरी तें तसेंच असणार. आणि, आढळणाऱ्या तसल्या सारखेपणामुळें, तिथें परभृततेचें पाणी मुरत असेल असेंच केवळ अध्याहृत धरायला नको. कारण जीविताचा सिंधू एकच असल्यामुळें, निसर्गाचें रूप एकच असल्यामुळें, हातीं लागणारे अनुभूतींचे मोती–दाणे एकासारखे एक असणें असंभाव्य नाहीं.

पण भिन्नता असते व्यक्तिमत्त्वांत. त्या व्यक्तिमत्वाचे बोल जी भिन्नता प्रगट करतील ती कितीशी हृद्य आहे, हेंच ललित वाङ्मयांत पाहावयाला हवें. नदी शेवटीं सागरालाच मिळाली आहे एव्हढ्या एका सर्व–सामान्य पर्यवसानावरून तिच्या मार्गक्रमणांतलि अनेकविध विलासांची रमणीयता उपेक्षणीय ठरवितां येईल काय? फुटबॉलच्या खेळांत चेंडू क्रीडांगणाच्या सीमेवर रोवलेल्या महाद्वारांतून पार घालविणें म्हणजे जरी ‘गोल’ असला आणि गोल हें प्रत्येक खेळाचें एकच एक पर्यवसान असलें तरी प्रतिक्षणीं प्रेक्षणीय जर कांहीं असेल तर त्या चेंडूची खेळाडूच्या पायांनीं महाद्वारापर्यंत चाललेली जीवितयात्रा. त्या त्याच्या जीवितयात्रेंतच खेळाडूचें व्यक्तिमत्त्व प्रगट होत असतें; आणि खरा रसिक तें पाहात असतो. वरती ‘सत्य वा सत्याभास याकडे जाण्याची आडवळणी पण स्वतांच्या पायाखालची वाट’ हा जो गुणविशेष सांगितला आहे तो ह्याच अर्थानें.

सातारा<br>
६-१२-४४

यशवन्त दिनकर पण्ढरकर